# इस्लामी
# शिक्षण
# व्यवस्था

* लेखक *

सैय्यद आबुल आला मौदूदी

* भाषांतर *

सय्यद जाकिर अली

## अनुक्रमणिका

प्रस्तावना ४

प्रकरण पहिले

आपल्या शिक्षण व्यवस्थेतील मूळ बिघाड ९

प्रकरण दुसरे

मुस्लिमांसाठी आधुनिक शिक्षणनीती व कार्यक्रम १४

प्रकरण तिसरे

मुस्लिमांकरिता आधुनिक शैक्षणिक ध्येय-धोरण २९

प्रकरण चौथे

पदवीदान समारंभाप्रसंगीचे भाषण ४९

प्रकरण पाचवे

नवीन शिक्षण व्यवस्था ५४

प्रकरण सहावे

शैक्षणिक चर्चासत्राचा वृत्तान्त ७९

प्रकरण सातवे

इस्लामी विद्यापीठाचे स्वरुप ९९

''अल्लाह, असीम कृपावंत व दयावंतच्या नावाने.''

## प्रस्तावना

पुढील पानावर मौलाना सय्यद अबुल आला मौदूदी (र) साहेबांचे काही निबंध सादर करीत आहोत. हे निबंध त्यांनी वेळोवेळी शिक्षण व प्रशिक्षणांसंबंधी लिहिले होते. त्यांनी ज्या काळात हे निबंध लिहिले होते, तो काळ बराच बदलला असल्याने त्यातील काही घटक सध्याच्या काळात अप्रासांगिक वाटत असले तरी त्या निबंधांची मूळ विचारसरणी बदललेल्या काळातसुद्धा अतिशय उपयुक्त आणि लक्षणीय आहे. या निबंधांच्या अभ्यासामुळे वाचकांवर ही वास्तविकता पूर्णपणे स्पष्ट होईल की, आपली वर्तमान शिक्षण आणि प्रशिक्षण व्यवस्था ज्यामध्ये मुस्लिम समुदायाची नवीन पिढी शिक्षण घेत आहे, ती इस्लामी श्रद्धा आणि उद्देश-लक्ष्यपूर्तीकरिता अतिशय घातक विष आहे. जर आपण शिक्षण आणि प्रशिक्षण व्यवस्था अशीच चालू ठेवली आणि आपली नवीन पिढी या घातक व्यवस्थेच्या खोल गर्तेत लोटून दिली तर ही पिढी इस्लामपासून खूप दुरावेल. मौलाना मौदूदी साहेबांच्या या निबंधांमध्ये इस्लामी शिक्षणाचा एक अशा प्रकारचा आराखडा मिळेल की, ज्याची आधारशिला इस्लामी श्रद्धा व संकल्पनेवर ठेवण्यात आली आहे. जर मुस्लिम प्रामाणिकपणे आपल्या नवतरुण पिढीमध्ये इस्लामी उद्देशाविषयी प्रेम आणि आस्था निर्माण करु इच्छित असतील तर वर्तमान शिक्षण व प्रशिक्षण व्यवस्थेस अशा प्रकारच्या प्रणालीपथावर न्यावे लागेल ज्याकडे मौदूदी साहेबांनी या निबंधांत मार्गदर्शन केले आहे. एवढे मात्र नक्की की ज्या मुस्लिमांनी आपली राष्ट्रीय प्रतिष्ठा आणि ऐहिक स्वार्थ इस्लामच्या गौरव आणि श्रेष्ठत्वासम समजली असेल त्यांना कदाचित या निबंधांतील सादर करण्यात आलेल्या शिक्षण पद्धती प्रभावित करु शकरणार नाहीत. कारण या निबंधांच्या अनुसारावरून स्पष्ट होईल की, इस्लामी उद्देशाची सेवा असेच लोक करू शकतात की ज्यांच्या मानगुटीवरुन राष्ट्रीय प्रतिष्ठा आणि ऐहिकसमृद्धीचे भूत पूर्णपणे उतरले आहे. तसेच जे केवळ ईशग्रंथ आणि त्याचे नियम व कायद्यांच्या प्रचार व प्रसारास आपल्या जीवनाचा उद्देश समजत आहेत. वर उल्लेख केल्याप्रमाणे हे निबंध आजच्या काळापेक्षा खूप भिन्न परिस्थितीत लिहिले गेले असल्यामुळे वाचकांना विनंती आहे की, यांचा अभ्यास करतेवेळी बदलत्या काळाचे स्वरुप दृष्टीसमोर ठेवावे.

# प्रकरण पहिले
## आपल्या शिक्षण व्यवस्थेतील मूळ बिघाड

'मुस्लिम यूनिव्हर्सिटी कोर्ट' ने गतवर्षीच्या वार्षिक संमेलनात (एप्रिल - १९३६) मध्ये एका अशा महत्त्वाच्या समस्येकडे लक्ष वेधले जिच्याकडे बऱ्याच काळापूर्वी लक्ष देण्याची गरज होती. अर्थात 'इस्लामी धर्मशास्त्र आणि इस्लामी ज्ञानाच्या शिक्षणातल्या त्रुटीतील सुधारणा आणि विद्यार्थ्यांमध्ये वास्तविक इस्लामची प्रेरणा निर्माण करण्याची गरज .' तसे पाहता आधुनिक ज्ञानविज्ञान आणि साहित्याच्या शिक्षणासाठी सरकारी विद्यापीठांमध्येसुद्धा आपल्या या अलीगढ विद्यापीठासारखीच उत्तम व्यवस्था आहे. केवळ एवढ्याच उद्देशपूर्तीसाठी मुस्लिमांना एक स्वतंत्र विद्यापीठ स्थापन करण्याची मुळीच गरज नव्हती. एका स्वतंत्र राष्ट्रीय विद्यापीठ उभे करण्याची कल्पना ज्या मूलभूत गरजेनुसार मुस्लिमांत निर्माण झाली आणि ज्या आधारावर या कल्पनेस प्रसिद्धी मिळाली ती मूळ कल्पना आणि मूलभूत गरज वस्तुत: ही होती की, मुस्लिमांनी आधुनिक ज्ञानाबरोबरच मुस्लिम स्वरुप कायम ठेवावे. अर्थात आधुनिक शिक्षणासह त्यांना इस्लामचे परिपूर्ण ज्ञानही मिळावे. ही मूलभूत गरज सरकारी महाविद्यालये आणि सरकारी विद्यापीठांतून पूर्ण होणे शक्य नाही. नेमक्या याच कारणास्तव मुस्लिमांना एका स्वतंत्र इस्लामी विद्यापीठाची गरज होती. मग त्यांचे स्वतंत्र विद्यापीठही त्यांची ही मुलभूत गरज पूर्ण करीत नसल्यास आणि तेथूनही सरकारी विद्यापीठातून निघणाऱ्या पदवीधरांसारखेच साम्यवादी, नास्तिक आणि उजव्या व डाव्या विचारसरणीचे पदवीधर निघत असल्यास लाखो रुपयांच्या खर्चाने स्थापन करून चालविण्यात येणाऱ्या विद्यापीठाचा काय उपयोग ?

हा प्रश्न इतका गंभीर होता की ज्याकडे अगदी सुरुवातीलाच लक्ष देण्याची गरज होती. विद्यापीठ स्थापन करतेवेळेसच सर्वप्रथम याकडेच लक्ष देण्याची गरज होती की, आपल्याला एक स्वतंत्र विद्यापीठ स्थापण्याची गरज कोणती आहे? तसेच ही गरज पूर्ण करण्याची उपाययजोना काय आणि कोणत्या स्वरुपाची असेल? एका टीकाकाराने आजकालच्या मुस्लिमांची व्याख्याच खऱ्या अर्थाने अशी केली की, 'हे लोक काम आधी करतात आणि विचार मात्र नंतर करतात.' अर्थात कोणतेही काम विचारांनी व्हावयास पाहिजे. परंतु मुस्लिमांचे तसे नाही. ज्या लोकांना विद्यापीठ स्थापन करण्याचे वेड होते, त्यांना केवळ वेडच होते. त्याचे

कोणतेच स्वरुप त्यांच्या डोक्यात नव्हते. मुळात त्यांच्या डोक्यात हा प्रश्नच नव्हता की एका मुस्लिम विद्यापीठाचे वास्तविक स्वरुप कसे असावे आणि कोणत्या वैशिष्ट्यांमुळे एखाद्या विद्यापीठास 'मुस्लिम विद्यापीठ' संबोधले जाऊ शकते. या वैचारिक अभावासह करण्यात आलेल्या कार्याचे परिणाम पण असेच समोर आले जसे आपण एक विद्यापीठ आग्रा येथे, दुसरे लखनौमध्ये आणि तिसरे ढाक्यात स्थापन केले आणि आता हे चौथे अलीगढ़ येथे. फरक काय उरला? केवळ 'मुस्लिम' शब्दाचा मान राखण्यासाठी थोडाफार धर्मशिक्षणाचा अभ्यासक्रम सामील करून प्रश्नकर्त्यांचे तोंड बंद करण्याचे निमित्त साधण्यात आले की या विद्यापीठाचे नाव 'मुस्लिम विद्यापीठ' का ठेवण्यात आले. परंतु वस्तुत: विद्यापीठ स्थापन करतेवेळेस असे कोणतेच वैशिष्ट्य निर्माण करण्यात आले नाही ज्याच्या आधारावर सामान्य विद्यापीठांत आणि इस्लामी विद्यापीठात काही विशेष फरक करता येईल.

हे शक्य आहे की, अगदीच सुरुवातीला विद्यापीठ स्थापन्याच्या धुंदीत इस्लामी विद्यापीठाच्या वास्तविक स्वरुपावर विचार करण्याची संधी मिळाली नसेलही कदाचित, परंतु विलक्षण बाब आणि विचित्र गोष्ट अशी की, विद्यापीठ स्थापनेस तब्बल पंधरा वर्षे लोटून गेल्यावरसुद्धा संचालक मंडळीस एकदासुद्धा या गोष्टीची जाणीव झाली नाही की, त्यांचा मूळ उद्देश आणि लक्ष्य कोणते आहे आणि त्यांचे अनुयायी कोणत्या मार्गाने वाटचाल करीत आहेत? सुरुवातीपासूनचीच अवस्था या गोष्टी स्पष्ट करीत आहे की, विद्यापीठ हे इस्लामी प्रणालीवर वाटचाल करीत नाही आणि पाहिजे असलेले परिणामही समोर येत नाहीत. सरकारी विद्यापीठांतील विद्यार्थी आणि येथील विद्यार्थी सारखेच दिसतात. त्यांच्यात कोणत्याच प्रकारचा फरक दिसत नाही. खरे पाहता या विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांमध्ये इस्लामी आचरण व गुण, इस्लामी प्रेरणा आणि इस्लामी प्रणाली स्पष्टपणे दिसावयास हवी होती. परंतु या ठिकाणचे चित्र अगदीच उलट आहे. येथे इस्लामी विचारसरणी आणि इस्लामी स्वभाव पाहायलाही मिळत नाही. अशा विद्यार्थ्यांची संख्या कदाचित एक टक्का पण नाही की जे या विद्यापीठातून इस्लामी दृष्टिकोन आणि इस्लामी उद्देश घेऊन निघाले असतील आणि ज्यांच्यात विद्यापीठाच्या शिक्षण प्रशिक्षणाने ही पात्रता निर्माण केली असेल की, आपल्या ज्ञान व विवेकाचा वापर करून मुस्लिम जनसमुदायात नैतिक जीवनाचा आत्मा फुंकला जाईल किंवा कमीतकमी आपल्या राष्ट्रासाठी एखादी उलेखनीय सेवा अथवा कामगिरी करुन दाखविली जाईल. हे तर सोडाच परिणामांचे स्वरुप सकारात्मक जरी असते तर गोष्ट वेगळी, परंतु अत्यंत दु:खाची बाब ही आहे की, या विद्यापीठातून निघणारे पदवीधर आणि शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची एक मोठी संख्या अशी आढळते की, ज्यांचे अस्तित्व इस्लामी संस्कृती आणि मुस्लिम राष्ट्रासाठी लाभदायक असण्याऐवजी नुकसानदायक जास्त आहे. धर्माप्रती त्यांच्या मनामध्ये द्वेषभावना निर्माण झाली आहे. त्यांची विचारसरणी अशी तयार करण्यात आली की, त्यांनी धर्माच्या बाबतीत संशयाच्या मर्यादा तोडून धर्म नाकारण्यापर्यंत मजल मारली. तसेच त्यांची तत्त्वे इस्लामच्या मूळ तत्त्वांविरुद्ध बंड करीत आहेत.

काही काळापूर्वी याच मुस्लिम विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांपैकी एक विद्यार्थी थोडीशी विवेकपूर्ण बुद्धी असल्याने धर्मभ्रष्ट होता होता वाचला. त्याने आपल्या एका व्यक्तिगत पत्राद्‌वारे तेथील दुरवस्थांकडे काही संक्षिप्त संकेत केले आहेत. हे पत्र प्रकाशित करण्यासाठी तर नाहीच, शिवाय अलीगढच्या दुरवस्थेवर प्रकाश टाकण्याकरितासुद्धा लिहिण्यात आलेले नाही. आमचा असा विचार आहे की, यात जे काही लिहिले गेले आहे ते विद्यापीठाच्या आंतरिक परिस्थितीची अत्यंत खरी रुपरेखा आहे. पत्र लिहिणाऱ्याने स्वत:हून आपल्या मानसिक उत्क्रांतीचे वर्णन करताना लिहिले आहे,

"अलीगढमध्ये इस्लामी जगताबाहेरील उपद्रव अर्थात साम्यवादाशी (कम्युनिझम) माझा संबंध आला. मी सुरुवातीस पाश्चात्यवादाच्या उपद्रवी विचारसरणीस विशेष धोकादायक बाब समजत नव्हतो. परंतु अलीगढमधील अनुभवांती वस्तुस्थिती माझ्यासमोर आली. 'इस्लामी हिंद'च्या या केंद्रामध्ये बरीच मोठी संख्या अशांची आहे, ज्यांनी इस्लाम धर्म सोडून साम्यवादाचा जोशपूर्ण प्रसार व प्रचार सुरु केला आहे. या प्रचारकांमध्ये शिक्षकवर्गातील बरेचजण सामील असून ते हुशार आणि अभ्यासु वृत्तीच्या सर्व विद्यार्थ्यांना आपल्या मायाजालात ओढण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतात. या लोकांचा साम्यवाद स्वीकारण्याचा हा मुळीच उद्देश नाही की, त्यांनी गरीब, शेतकरी आणि मजुरांची मदत करावी. कारण त्यांची कार्यात्मक जीवनचर्याच अशी आहे की, यामुळे त्यांच्या कृत्रिमता आणि दांभिकतेचा पर्दाफाश करते. उलट त्यांनी साम्यवाद याकरिता स्वीकारला आहे की, त्यांना जागतिक साम्यवादी चळवळीच्या छत्रछायेत आपल्या नैतिक बिघाड, आपल्या स्वभावातील नास्तिक प्रवृत्ती आणि भोंगळ विचार (Loose thinking) यासारख्या इतर अनेक भ्रष्ट प्रवृत्तींना न्यायिक प्रमाण मिळावे. या साम्यवादाने सुरुवातीस माझ्यावरसुद्धा भुरळ टाकली. सुरुवातीस मला असेच वाटले की, कदाचित हा इस्लामचाच Unaut Horised Edition असावा. परंतु गंभीरपणे विचार केल्यावर ही सत्यस्थिती समोर आली की, इस्लाम आणि साम्यवादाच्या मूळ उद्देशात जमीन अस्मानाचा फरक आहे."

या भाष्यावरून अगदीच स्पष्टपणे ही बाब लक्षात येते की, ज्याकरिता सर सय्यद अहमद खान, मोहसिनुल मलिक आणि विक़ारुल मलिक वगैरे महाभागांनी एका मुस्लिम विद्यापीठाची गरज व्यक्त केली होती आणि ज्याकरिता मुस्लिमांनी आपल्या ऐपतीहून जास्त या विद्यापीठाच्या निर्माणाचे धूमधडाक्यात स्वागत केले होते, त्या मुस्लिम विद्यापीठाच्या शिक्षणाचे परिणाम इस्लामकरिता अत्यंत घातक होत आहेत.

आपण अशा अभियंत्याच्या बाबतीत कोणत्या प्रकारचे मत व्यक्त कराल की, ज्याने तयार केलेली मोटारगाडी पुढे पळण्याऐवजी मागेच धावत सुटते आणि तो अभियंता (Engineer) आपल्या दृष्टिकोनात कसा कार्यकुशल बनेल जो स्वत: तयार केलेली मोटारगाडी सतत उलट्या दिशेनेच धावताना पाहूनसुद्धा त्याला या गोष्टीची जाणीवच होऊ नये की, आपल्या

तंत्र योजनेत वा प्लॅनिंगमध्ये कोठेतरी चूक घडली. मला तर नाही वाटत की, अशा वृत्तीचा एखादा अभियंता कोणास सापडेल. परंतु आपल्या मुस्लिम राष्ट्राचे शैक्षणिक अभियंते कशा दर्जाचे कौशल्यवान आणि पटाईत आहेत ह्याचा अनुमान या संघस्थितीवरुन होतो. त्यांनी एक प्रकाचे शैक्षणिक यंत्र तयार करण्याचा मानस रचला, योजना आखली. या यंत्रास इस्लामी उद्दिष्टपूर्तीकडे गती देण्याचा हेतु होता, परंतु जे यंत्र त्यांनी तयार केले, ते उलट्याच दिशेने फिरु लागले. ते सतत पंधरा वर्षांपासून फिरत असतानासुद्धा एकाही दिवशी त्यांना याची जाणीव झाली नाही की त्यांच्या इंजिनीयरिंग प्लॅन (Engineering Plan) मध्ये कोणती चूक घडली !!

आता हे उलटे फिरणारे यंत्र आवाक्याबाहेर गेल्यानंतर यूनिव्हर्सिटी कोर्टाला आठवण झाली की,

"मुस्लिम विद्यापीठाच्या निर्माणाचा मूळ उद्देश होते की येथील विद्यार्थ्यांमध्ये इस्लामी आत्मा फुंकण्यात यावा."

या गरजपूर्तीस्तव सातजणांची एक समिती स्थापन करण्यात आली आणि या समितीवर जवाबदारी टाकण्यात आली की,

"संपूर्ण वस्तुस्थितीचा गंभीरपणे अभ्यास करून धर्मशास्त्र आणि इस्लामी शास्त्रांच्या शिक्षणासाठी अशा आधुनिक माध्यमाच्या वापरण्याची शिफारस करण्यात यावी की जे वर्तमान स्थितीस पूरक आणि फायदेशीर आहेत आणि अशा माध्यमांद्वारा इस्लामी शिकवणीस जास्तीतजास्त प्रभावीपणे मांडता यावे."

मोठ्या आनंदाची गोष्ट आहे! शुभेच्छापात्र गोष्ट आहे! उशिरा का होईना पण खऱ्या मार्गाला लागले, तेवढेच समाधान! आज जरी आपल्या 'शैक्षणिक इंजिनीयरांना' याची जाणीव झाली की, आपले 'शैक्षणिक यंत्र' चुकीच्या पद्धतीने तयार झालेले आहे आणि आपल्या मूळ उद्दिष्टाविरुद्ध धावत असण्याचे मूळ कारण हे केवळ योगायोग नसून त्याच्या मूळ योजनेतीलच त्रुटी व बिघाड आहे आणि आपण आपल्या अनावर झालेल्या आनंदाच्या भरात हे सांगायला तयार झाले की, मागच्या आणि पुढच्यांनो! या आणि आता आपण मागील चुकांना समजून घेऊन एक खरी व अचूक योजना आखून शिक्षण यंत्रणा तयार करु या. परंतु मला वाटते की, अजूनही यांना आपल्या अक्षम्य चुकांची खरी जाणीव झालेली दिसत नाही. अजूनही ते या गोष्टी स्वीकारण्यास तयार नाहीत की, त्यांच्या शिक्षण योजना आखणीत काही मूळ बिघाड आहेत. ते केवळ आज परिणामांच्या भयानक स्वरुपाला पाहूनच प्रभावित झालेले असून केवळ वरपांगी दृष्टीने ते वस्तुस्थितीकडे पाहत आहेत.

ईश्वर माझी ही शंका चुकीची ठरवो! परंतु वर्तमानातील अनुभव मला अशीच शंका घेण्यास विवश करतात. गत दोन शतकांच्या ऱ्हासाच्या भयानक राजकीय क्रांतीचा अंत झालेल्या मागील शतकाचे मध्य, या मध्यकाळात मुस्लिमांच्या बुडत्या जहाजास सावरणारे काहीजण

अचानक समोर आले होते. तो काळ जास्त विचार करण्याचा नव्हताच मुळी. एवढी विचार करण्याची सवड़च कोठे होती की या बुडत्या जहाजाऐवजी एक नवीन आणि दणकट जहाज कोणत्या योजनेवर तयार करावे? त्या वेळी केवळ एकच प्रश्न आ वासून उभा होता की, बुडणाऱ्या या राष्ट्राला कशा प्रकारे वाचविता येईल? जहाज चालकांच्या एका समुदायाने क्षणाचाही विलंब न करता याच मोडक्या जहाजाची डागडुजी सुरु केली. त्याच्याच मोडकळीस आलेल्या फळ्यांना जोड़ले. त्यात पडलेल्या भेगा आणि छिद्रे बुजविली आणि तात्पुरत्या का होईना, कसेबसे जहाज पूर्ववत केले. दुसऱ्या समुदायाने तत्काळ एक नवीन दोन कप्प्याचे जहाज भाड्याने घेऊन बुडणाऱ्यांपैकी बऱ्याच जणांना यात सामावून घेतले. अशा प्रकारे चालकांच्या दोन्ही समुदायांनी अचानक ओढवलेल्या संकटापासून वाचविले. परंतु या दोन्ही समुदायांचे प्रयत्न केवळ अशा स्वरुपात यशस्वी होते की, त्यांनी अगदीच संकटसमयी बुडत्यांना वाचविले. केवळ बुडणाऱ्यांना वाचविण्यासाठीच ही तात्पुरत्या स्वरुपाची योजना आणि विवेकता यास म्हणता येईल. आता जे लोकं या वेळी टळलेल्या संकटानंतरसुद्धा याच दोन्ही अस्थायी स्वरुपाच्या योजनांना स्थायी स्वरुपात यशस्वी असण्याचा गैरसमज करुन घेत आहेत. अर्थातच अशा प्रकारचा गैरसमज अविवेकपूर्ण आहे. कारण अजूनही जुन्या आणि मोडकळीस आलेल्या जहाजाची डागडुजी करून त्यास तशा अवस्थेत चालू ठेवून चालणार नाही. या मोडक्या तुटक्या आणि ठिगळे लावलेल्या जहाजात बसून मुस्लिम समुदाय इतर अशा समुदायाच्या लोकांशी स्पर्धा कशी करणार की, ज्यांच्याकडे हजारपटीने जास्त वेगवान आणि तेही इतरांकडून भाड्याने घेतलेले जहाज नसून स्वत:च्या मालकीचे आहे. मुस्लिमांनी जे दुसरे जहाज भाड्याने घेतलेले आहे, ते पण इतरांच्या स्पर्धेत टिकू शकणार नाही. कारण हे भाड्याचे जहाज नवीन आणि वेगवान असले तरी ते मुळात आहेच दुसऱ्याचे. दुसऱ्यांनीच त्यास तयार केलेले आहे. त्याची निर्मिती योजना आणि आराखडा मुळातच दुसऱ्यांनीच तयार केलेला असणार. आपण कोणत्या आधारावर अशी आशा बाळगू शकतो की, हे भाड्याचे जहाज आपल्याला किनाऱ्यावर नेऊन सोडेल? उलट या गोष्टीचीच जास्त संभावना आहे की, त्याच्या तीव्रगतीमुळे तो आपणास किनाऱ्यावर नेऊन सोडण्याऐवजी किनाऱ्यापासून दूरवर नेऊन कोठे सोडून देईल; हे पण सांगता येत नाही. अचानक ओढवलेल्या संकटसमयी भाड्याने जहाज घेऊन बुडत्यांचे प्राण वाचविणारे चालक निश्चितच बरोबर भूमिका निभावत होते. कारण ती वेळच तशी होती. लोकांचे प्राण वाचविणे हेच मुख्य लक्ष्य आणि हेतु होता. याचबरोबर फाटलेल्या ठिकाणी ठिगळे लावून कसेबसे तात्पुरते जहाज चालण्यायोग्य तयार करून बुडत्यांचे प्राण वाचविणाऱ्या काही चालकांची भूमिकासुद्धा योग्यच होती. परंतु आता मात्र हे दोन्ही समुदाय चुकीचे आहेत.

वास्तविक नेत्यांची आणि वास्तविक सुधारकांची व्याख्या अशी आहे की, तो साकल्यपूर्ण विचाराने कार्य करतो. तसेच वेळ आणि प्रसंगास अनुसरून जी योग्य योजना

असेल, त्यानुसार कार्य करतो. यानंतर जे लोक त्याचे अनुकरण करतात, ते अंधानुकरण करणारेच असतात. त्या बिकटसमयी त्याने नेतृत्वाच्या ज्या पद्धतीचा अंगीकार केला होता, तीच पद्धत संकटकाळ बदलल्यानंतरसुद्धा अगदीच डोळे बंद करुन अंगीकारतात. एवढापण विचार करण्याची तसदी घेत नाहीत की भुतकाळात जी पद्धत योग्य आणि लाभदायक होती, तीच पद्धत सद्यस्थितीत अयोग्य आणि हानिकारक आहे. मागील शतकातील नेत्यांनी जी पद्धत आणि प्रणाली आपल्या अनुयायांना दिली होती, तीच पद्धत अगदी त्याच स्वरुपात अनुसरण्याचा वेड़सर हट्ट ह्या अनुयायीजणांनी धरलेला आहे. खरे पाहता तो काळ लोटला म्हणून आता साकल्यपूर्ण विचार करुनच नवीन प्रणाली अवलंबिण्याची गरज आहे.

दुर्दैव असे की उपरोल्लेखित दोन्ही प्रकारच्या जहाजचालकांच्या समुदायात मला एकही-जण साकल्यपूर्ण बुद्धीचा दिसत नाही. मोडक्या जहाजास दुरुस्त करणाऱ्या समुदायाने साकल्यपूर्ण विचार करण्याचे जर धाडस केलेच तर ते पण एवढ्यापुरतेच की त्याने जहाजात थोडेफार विद्युत दिवे लावले आणि काही नवीन फर्निचर त्यात बसविले अथवा त्यास एखादा हॉर्न बसवून जोरजोरात शिट्ट्या वाजवून इतर लोकांना जहाज नवीन असण्याचा खोटा भास करून दिला, एवढेच! याशिवाय जर नवीन जहाजाचे प्रवासी जरी दुसऱ्या जहाजात बसले असतील आणि तीव्र गतीने उलट दिशेने जात असतील तरी त्यात दोनचार जुने शीढ़ विसाव्या शतकाच्या या अपटूडेट जहाजात लावलेले असतील जेणेकरून स्वत:लाही आणि मुस्लिमांना अशी भुरळ घालणे संभव व्हावे की हे जहाजसुद्धा इस्लामी जहाज असून इंग्लंडच्या मार्गाने हजयात्रेस जात आहे.

अंधानुकरण आणि याचबरोबर साकल्याचे हे खोटारडे आणि लटके प्रदर्शन होय. एक वादळ संपले. आता दुसरे वादळ पण येऊन ठेपले. भारतामध्ये आणखीन एका राजकीय क्रांतीचे बीज रोवण्यात येत आहे. जगातील देशांमध्ये आणखीन एका मोठ्या क्रांतीची तयारी होत असून या गोष्टीची तीव्र संभावना आहे की, भारतामध्ये अपेक्षित असलेल्या क्रांतीऐवजी अचानक आणि अनपेक्षित व हजारपटीने मोठी क्रांती घडेल. या घडून येणाऱ्या भावी क्रांतीचे तीव्रतेचे स्वरुप इ.स. १८५७ च्या तुलनेत खूप वेगळे असेल. सद्यस्थितीतील मुस्लिमांच्या धार्मिक, नैतिक आणि कार्यात्मक परिस्थितीस पाहून तर असे मुळीच वाटत नाही की ते या येणाऱ्या तीव्र वादळाचा एकही तड़ाखा सहन करु शकतील. कारण त्यांचे जुने जहाज आधुनिक काळाच्या कोणत्याही तीव्र वादळाच्या तड़ाख्यात तग धरु शकत नाही. वादळाच्या केवळ पहिल्याच फटक्यासरशी त्याची शकले पडतील. त्याच्या फळ्या अस्ताव्यस्त आणि त्याचे शीड उद्ध्वस्त होतील. शिवाय भाड्याने घेतलेल्या जहाजाची परिस्थिती तर जुन्या जहाजापेक्षाही खूप जास्त भयानक आहे. मला तर याचे भय वाटते की, यात प्रवास करणारे प्रवासी वादळी परिस्थितीच्या पहिल्याच तड़ाख्यात मुस्लिम जनसमुदायापासून विभक्त होऊन किंबहुना भ्रष्टतेच्या अतिखोल गर्तेत पडतील. आता हीच नेमकी वेळ आहे की, मुस्लिमांनी

जुन्या जहाजातूनही बाहेर पडावे आणि भाड्याचे जहाजही सोडून द्यावे आणि स्वत:च आधुनिक स्वरुपाच्या जहाजाची निर्मिती करावी. त्याची गतीसुद्धा वर्तमान काळातील इतर जहाजाएवढी असावी, परंतु त्याचे तंत्र नियोजन व डिझाईन इस्लामी जहाजाचे असावे. तसेच त्याचे खलाशी, इंजिनीयर्स, कप्तान आणि सर्वच जण हजयात्रेच्या मार्गाचे व पद्धतीचे ज्ञाते असावेत.

उदाहरणांची आणि उपमांची भाषा वापरण्याऐवजी आता काही गोष्टीं स्पष्ट शब्दांत सांगतो. सर सय्यद अहमद खान (ईश्वर त्यांना क्षमा करो !) यांच्या नेतृत्वात अलीगढ़ येथे जी शैक्षणिक चळवळ सुरु झाली होती, तिचा तात्पुरता उद्देश केवळ एवढ़ाच होता की, मुस्लिमांमध्ये आधुनिक काळातील आवश्यकता आणि गरजांची जाण करून घेण्याची पात्रता निर्माण व्हावी. आधुनिक शिक्षण घेऊन आपली आर्थिक आणि राजकीय परिस्थिती दुरुस्त करावी. देशाच्या आधुनिक व्यवस्थेचा लाभ घेणे तेव्हा शक्य नव्हते. कदाचित या शैक्षणिक चळवळीमध्ये लाभासहित नुकसान जरी असले तरी त्या वेळी एवढ़ी सवड़च नव्हती की, पूर्ण विचाराअंतीच एखादी अशी मजबूत व स्थिर शैक्षणिक पॉलिसी निर्धारित करता यावी की ज्यामध्ये नुकसान न होता केवळ लाभच होईल. त्याचप्रमाणे हव्या असलेल्या लाभदायक शिक्षणाच्या पॉलिसीवर कार्य करण्याचेही कोणतेच साधन उपलब्ध नव्हते म्हणून तात्पुरती गरज व आवश्यकता समोर ठेवून मुस्लिमांना याच प्रचलित असलेल्या व अनेक त्रुटी असलेल्या शिक्षण पद्धतीत लोटण्यात आले. थोडा फार त्यात इस्लामी शिक्षणाचा अंश आणि तोही आधुनिक शिक्षणाशी ज्याचा लवलेशही नव्हता, सामील करण्यात आला.

हा केवळ तात्पुरता आणि प्राथमिक उपाय व उपचारच होता की, जो एका अकस्मात ओढवलेल्या भयानक संकटापासून वाचविण्यासाठी स्वीकारण्यात आला होता. आता तो प्रसंग टळला असून निर्धारित करण्यात आलेल्या उपाययोजनेचा लाभही मिळाला आहे. त्याचप्रमाणे ती संकटे आणि अडचणीसुद्धा स्पष्ट झालेल्या आहेत ज्या त्याप्रसंगी अनाकलनीय स्वरुपात होत्या. या शैक्षणिक चळवळीमुळे काही भौतिक लाभ झाला असला तरी त्याहीपेक्षा धार्मिक व आध्यात्मिक नुकसानच जास्त झाले. यामुळे मुस्लिम समाजात काळे फिंरगी निर्माण करण्यात आले. या शिक्षण पद्धतीने आपल्यामध्ये अँग्लोमोमेडन आणि अँग्लोइंडियन निर्माण केले आणि ते पण अशाप्रकारचे की ज्यांच्या मानसिकतेमध्ये मोमेडन आणि इंडियन नावाच्या गुणधर्माचे प्रमाण अगदीच तुरळक आहे. यामुळे आपल्या राष्ट्राचे बुद्धी-अवयव असलेल्या उच्च व मध्यम वर्गाची संस्कृती दृष्य आणि अदृष्य स्वरुपात यूरोपच्या फिरंगी, भौतिक आणि उपद्रवी संस्कृतीच्या जबड़्यात गेली. तेही एवढ्याशा मोबदल्यात की काही हुद्दे, अधिकार वगैरे अशांना मिळाले की जे स्वभावाने व मानसिकतेने मुस्लिम नसून त्यांची तेवढ़ी नावे मुस्लिमांसारखी आहेत. प्रश्न असा आहे की, आता हीच शिक्षणप्रणाली कायमस्वरुपी पुढे चालू द्यायची काय? जर हीच शिक्षणपद्धती कायमस्वरुपी आपल्याला हवी आहे तर मग अलीगढ़ची काहीच गरज नाही. भारताच्या प्रत्येक मोठ्या शहरी एका अलीगढ़चे अस्तित्व आहे. अशा

प्रकारच्या अलीगढ़ांतून धडाधड़ 'ॲंग्लोमोमेडन' आणि 'ॲंग्लोइंडियन' निर्माण होत आहेत. मग याकरिता आपल्याला एका स्वतंत्र विद्यापीठाची गरजच काय आहे? आता जर आपणास वस्तुत: ही परिस्थितीच बदलायची असेल तर जरा विवेकपूर्ण बुद्धीने या रोगाचे नेमके कारण जाणून घेऊन त्याचे निदान करणे आवश्यक आहे.

आधुनिक शिक्षण पद्धतीच्या स्वभावाचा व प्रकृतीचा आढावा घेतल्यास अशी वस्तुस्थिती समोर येते की, ही शिक्षण पद्धतीच मुळात इस्लामी स्वभावाविरुद्ध आहे. जर आपण आपल्या या नवीन पिढ़ीस हे शिक्षण दिले तर आपण त्यांना इस्लामविरोधी जबड्यात आपल्याच हाताने ढकलून देऊ. आपण त्यांना अशा प्रकारचे शिक्षण देत आहोत जे या सृष्टीच्या समस्यांचे ईश्वराशिवाय निदान करु इच्छिते. अर्थातच या शिक्षण पद्धतीत शिकविण्यात येणारा सिद्धान्त बुद्धीसंमतीविरुद्ध आणि कल्पनेवर आधारित आहे. या शिक्षणाद्वारे राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, कायदा आणि इतर सर्वच प्रकारचे सिद्धान्त प्रदान करण्यात येत आहे की, जे नियम आणि कार्यात्मकरीत्या इस्लामी विचारसरणीच्या अगदीच विरुद्ध आहे. या नवीन पिढ़ीचे प्रशिक्षण पूर्णत: अशा संस्कृतीच्या सान्निध्यात होत आहे की, जी आपल्या आत्मा, उद्देश व हेतुनुसार सर्वस्वी इस्लामी संस्कृतीच्या विरुद्ध आहे. मग एवढ़ी प्रतिकूल शिक्षण पद्धती असताना आपण ही आशा कोणत्या आधारावर बाळगू शकतो की, या प्रशिक्षितांचा व विद्यार्थ्यांचा दृष्टिकोन हा इस्लामी दृष्टिकोन असेल? त्यांची मानसिकता आणि जीवनशैली ही इस्लामी जीवनशैली कशी काय होईल? प्राचीन शिक्षण पद्धतीवर आधारित कुरआन व हदीस (प्रेषित वचने) आणि इस्लामी विधीचे शिक्षण या नवीन शिक्षण पद्धतीबरोबर बेजोड़ आहे. अशा प्रकारच्या प्रयत्नांतून कोणतेही लाभदायक परिणाम समोर येण्याची शक्यता नाहीच मुळी. याचे उदाहरण असे आहे की, जसे फिरंगी स्टीमरमध्ये जुने शीड़ केवळ वरवर दाखविण्यासाठी लावण्यात आले असावे. परंतु या शीडामुळे फिरंगी स्टीमर कधीच इस्लामी स्टीमर होऊ शकणार नाही.

जर खरोखरच अलीगढ़ विद्यापीठास मुस्लिम विद्यापीठ बनवायचे असेल तर सर्वप्रथम येथील अभ्यासक्रमातल्या पाश्चात्य ज्ञान व कौशल्याच्या शिक्षणाचा फेर आढावा घेण्यात यावा. हा अभ्यासक्रम आहे त्या स्थितीत स्वीकारणे योग्य होणार नाही. विद्यार्थ्यांच्या कोवळ्या मनावर याचा असा विपरित परिणाम होतो की, ते पाश्चात्य वस्तु व विचारसरणीसमोर आत्मसमर्पण करतात आणि नतमस्तक होतात. टीकात्मक अभ्यास करण्याची व मूल्यमापन करण्याची पात्रता त्यांच्यात निर्माण होतच नाही आणि झाली तरी हजार विद्यार्थ्यांपैकी एखाद्यामध्ये आणि तेसुद्धा वर्षानुवर्षाच्या गंभीर अभ्यासानंतर! तोपर्यंत त्याचे वय निघून गेलेले असते व काम करण्याची संधीसुद्धा निघून गेलेली असते. संपूर्ण पाश्चात्य विद्यांचा टीकात्मक वेध घेऊन विद्यार्थ्यांसमोर सादर करण्यात याव्यात. तसेच टीका केवळ इस्लामी विचारसरणीच्याच आधारावर व्हावी की जेणेकरून प्रत्येक ठिकाणी त्यातील इस्लामविरोधी घटक बाजूला सारता येतील आणि केवळ फायद्याच्याच घटकांना घेता येतील. एव्हाना ही पद्धतच मुळात बदलण्याची गरज आहे.

त्याचबरोबर इस्लामी शास्त्रविद्यासुद्धा प्राचीन ग्रंथांतून जशास तसे न घेता त्यातूनही नंतरच्या काळातील धर्मशास्त्र्यांनी केलेली भेसळ दूर करून इस्लामच्या स्थायी नियमांना, वास्तविक श्रद्धात्मक नियमांना आणि कायमस्वरुपी असणाऱ्या विधीतत्त्वांना घेण्यात यावे. त्यांचा मूळ आत्मा आणि स्पिरीट अंत:करणात निर्माण करावी. त्यांच्यात बुद्धिमत्ता, विवेक, विश्वास आणि धर्मभावना निर्माण करावी. ही गरज पूर्ण करण्यासाठी तुम्हाला कोठेही तयार (Readymade) अभ्यासक्रम मिळणार नाही. त्याकरिता तुम्हालाच अगदी प्रत्येक बाब प्रारंभीपासून तयार करावी लागेल. दिव्य कुरआन आणि प्रेषितचरित्राचे शिक्षण सर्वप्रथम महत्त्वाचे आहे. परंतु हे शिक्षण प्राचीन ग्रंथातून नसावे. या विद्या शिकविणारे शिक्षक हे दिव्य कुरआन आणि प्रेषितचरित्राच्या शिकवणीचे मूळ आत्म्यापर्यंत पोहोचवलेले असावे. त्याचबरोबर इस्लामी विधीचे शिक्षणसुद्धा आवश्यक आहे. परंतु या ठिकाणीसुद्धा केवळ प्राचीन ग्रंथावर भीस्त ठेवून चालणार नाही. तुम्हाला अर्थशास्त्राच्या शिक्षणात इस्लामी अर्थव्यवस्थेचे नियम व तत्त्वे, कायद्याच्या शिक्षणात इस्लामी विधीचे शिक्षण, तत्त्वज्ञानाच्या शिक्षणात इस्लामी तत्त्वज्ञानाची विचारसरणी, इतिहासशास्त्राच्या शिक्षणात इस्लामी इतिहासाच्या विचारसरणीची वास्तविकता आणि प्रत्येक विषयाच्या शिक्षणात इस्लामी विचारसरणीचे प्रभुत्व असावयास हवे.

आपल्या शिक्षकवर्गात जे नास्तिक आणि निधर्मी स्वभावाचे शिक्षक भरती करण्यात आले आहेत, त्यांना कायमस्वरुपी कमी करण्यात यावे. सुदैवाने आपल्या भारतात एक संघटना अशा लोकांची निर्माण झालेली आहे की, आधुनिक ज्ञानाबरोबरच ज्यांचे स्वभाव, मानसिकता आणि विचारसरणी इस्लामी आहे. या विखुरलेल्या माणिकमोत्यांना एकत्र करावे की, जेणेकरून ते आधुनिक साधनसामुग्रीचा योजनाबद्ध वापर करून इस्लामी प्लॅननुसार एक स्टीमर तयार करतील.

तुम्ही म्हणाल इंग्रजसत्ता अशा शैक्षणिक पॅटर्नची (Pattern) ची परवानगी देणार नाही. परंतु तुम्ही त्यांना विचारा की, सर्व मुस्लिम आणि सर्व कम्युनिस्टांपैकी कोणाला पसंत करता? या दोन्हींपैकी एकाचा तर नक्कीच स्वीकार करावा लागेल. इ. सन १९१० चा 'अँग्लोमोमेडन' असलेला मुस्लिम आता आणखीन जास्त मुदतीपर्यंत आढळणार नाही. आता इंग्रजी सत्ता जर मुस्लिमांच्या नवीन पिढीस पूर्णत: कम्युनिस्टच्या स्वरुपात पाहू इच्छित असेल तर आपला जुनाच मुस्लिमद्धेष आणि इस्लामशी असलेले वैरत्व कायम ठेवावे. जर हे मान्य नसेल तर केवळ मुस्लिमांतच नव्हे तर साऱ्या भारतातही कम्युनिझमचा वाढता प्रादुर्भाव खेड्यापाड्यात चालणाऱ्या रेडियोच्या माध्यमाने रोखणे मुळीच शक्य नाही. या भयंकर संसर्गजन्य असलेल्या कम्युनिझम नावाच्या रोगास आळा घालण्यासाठी केवळमात्र जगात अशी एकच शक्ती आहे आणि त्या शक्तीचे नांव आहे "इस्लाम".

(संदर्भ : तर्जुमानुल कुरआन (मासिक) ऑग. १९३६ इ.स.)

# प्रकरण दुसरे

## मुस्लिमांसाठी आधुनिक शिक्षणनीती व कार्यक्रम

(मुस्लिम विद्यापीठ अलीगढच्या 'मज्लिस इस्लाह-ए-निसाब-ए-दीनियात' अर्थात 'धार्मिक अभ्यासक्रम सुधारणा परिषद'कडून पाठविण्यात आलेल्या तपासपत्रकाच्या उत्तरादाखल पाठविण्यात आलेला मौलाना सय्यद अबुल आला मौदूदी (र) यांचा हा विशेष अभिप्राय होय. मुस्लिम विद्यापीठास पाठविण्यात आलेल्या या मार्गदर्शक अभिप्रायपत्रात सर्वच मुस्लिम शिक्षण संस्थांकरिता एक उत्कृष्ट मार्गदर्शन आहे. यामध्ये शैक्षणिक कार्यक्रमाचे स्पष्टीकरण करण्यात आले असून हा अभिप्राय मुस्लिमांसाठी अत्यंत लाभदायक आहे.)

मुस्लिम यूनिव्हर्सिटी कोर्टचे या बाबतीत सर्व मुस्लिम आभारी आणि ऋणी आहेत. त्याने आपल्या मूळ हेतू अर्थात विद्यार्थ्यांमध्ये वास्तविक इस्लामी प्रेरणा निर्माण करण्याकडे विशेष लक्ष दिले असून याची अंमलबजावणी करण्यासाठी आपली परिषद नेमली आहे. या उद्देशपूर्तीस्तव जी पत्रके विद्यापीठाने मला पाठविली आहेत, त्यांचा मी गंभीरपणे अभ्यास केला आहे. यात संशयच नाही की, सध्याचे धार्मिक शिक्षण आणि इस्लामी शास्त्राचे शिक्षण व अभ्यासक्रम सर्वच दृष्टिकोनांतून पाहता असमाधानकारक आहे. जो अभ्यासक्रम विद्यार्थ्यांना सध्या शिकविला जात आहे, तो त्रुटींनी भरलेला आणि अपुऱ्या स्वरुपाचा आहे. तरी पण परिषदेच्या प्रतिष्ठित सभासदांनी ज्या स्वरुपाचे प्रश्न उपस्थित केले आहेत, त्यांना पाहून असे निश्चितच वाटते की, या वेळी परिषदेच्या सभासदांसमोर केवळ अभ्यासक्रमात थोडाफार बदल घडविण्यास्तव अभ्यासक्रमातील काही विषय वगळून काही इतर विषयांच्या पुस्तकाचा समावेश करण्यात यावा त्यामुळे विद्यार्थ्यांत इस्लामी प्रेरणा निर्माण होईल. जर माझा हा विचार बरोबर असेल तर मला हे आवर्जून सांगावेसे वाटते की, हे मूळ समस्येचे समाधान करण्याचे अगदीच अयशस्वी प्रयत्न आहेत. या गंभीर समस्येच्या समाधानास्तव आपणास आणखीन खोलवर आणि गंभीरपणे विचार करण्याची गरज आहे. सध्या शिकविण्यात येणाऱ्या कुरआन, हदीस आणि इस्लामी विधीशास्त्राचे शिक्षण देऊनसुद्धा विद्यार्थ्यांमध्ये वास्तविक इस्लामी प्रेरणा निर्माण का होत नाही? जर केवळ सद्यस्थितीत शिकविण्यात येणाऱ्या इस्लामी अभ्यासक्रमातील त्रुटी दूर करून लक्ष्य साधता येणे शक्य असेल तर ठीक, नसता त्याची कारणे जास्त खोलवर रुजलेली असल्यास सुधारणेस्तव अथवा लक्ष्य साधण्यास्तव केवळ इस्लाम धर्माच्या अभ्यासक्रमात बदल घडवून आणण्यात काहीच अर्थ नाही. यासाठी सुधारणांच्या कार्यक्रमात जास्त विस्तार असावयास पाहिजे. मग यामध्ये कितीही परिश्रम उचलावे लागले तरी चालेल. मी या समस्येवर याच दृष्टिकोनाने विचार केलेला आहे आणि ज्या निष्कर्षांवर मी पोहोचलो आहे, ते मी येथे संक्षिप्तपणे सादर करीत आहे.

**क्रमांक एक**

या वेळी मुस्लिम विद्यापीठ अलीगढमध्ये शिकविण्यात येणारा अभ्यासक्रम म्हणजे आधुनिक आणि इस्लामी शिक्षणाची अशा स्वरुपाची भेसळ आहे की ज्यामध्ये या दोन गोष्टींतील भेसळीमध्ये एकरुपता नाही. यामध्ये दोन अगदीच विभिन्न प्रकारच्या बिनजोड स्वरुपाच्या शैक्षणिक घटकांना जशास तसे घेऊन एके ठिकाणी जमा करण्यात आलेले आहे. या मिश्रणात ही पात्रताच निर्माण करण्यात आलेली नाही की, या दोन्ही घटकांनी मिळून आपल्या ज्ञानशक्तीद्वारे एखाद्या संस्कृतीची सेवा करावी. हे दोन्ही घटक एकत्र येऊनसुद्धा ते केवळ पृथकच राहत नाहीत तर एक दुसऱ्यांचा विरोध करुन विद्यार्थ्यांच्या आकलन शक्ती व विचारबुद्धीस दोन विरुद्ध दिशांमध्ये घेऊन जातात. इस्लामी दृष्टिकोनास बाजुला ठेवून केवळ शैक्षणिक दृष्टिकोनाने पाहिले तरी असेच सांगावे लागेल की, दोन विरुद्ध स्वभावी आणि विरुद्ध स्वरुपी घटकांचे मिश्रणच मुळात चुकीचे ठरते व यामुळे कोणतेही चांगले परिणाम समोर येत नाहीत. इस्लामी दृष्टिकोनाने पाहिल्यास ही परिस्थिती आणखीनच गंभीर आणि क्लिष्ट सिद्ध होते. मग यामध्ये आणखीन गंभीर बाब अशी आहे की, भेसळीमधील या दोन विसंगत व विभिन्न घटकांचे प्रमाणसुद्धा समान नाहीत. यामध्ये पाश्चात्य घटकाचे प्रमाण जास्त असल्याने ते शक्तिशाली व प्रभावी असून त्याच्या तुलनेत इस्लामी घटक कमी प्रमाणात आणि प्रभावहीन आहेत. पाश्चात्य घटकास प्रथम लाभ असा होतो की, ते एक आधुनिक आणि प्रचलित घटक असून त्याच्याच पाठीशी काळाच्या वेगवान गतीची शक्ती आणि जागतिक शासन संस्कृतीची शक्ती कार्यरत आहे. मग त्या घटकाचे शिक्षणही आपल्या विद्यापीठात तेवढ्याच प्रतिष्ठेत आणि प्रभावीपणे देण्यात येत आहे. याचबरोबर ते इतर अशा विद्यापीठांतसुद्धा आहे की, जी विद्यापीठे पाश्चात्य संस्कृतीच्या संवर्धन कार्यास्तव उभारण्यात आली आहेत. या विद्यापीठांमध्ये पाश्चात्य ज्ञान व कौशल्याचे शिक्षणच मुळात अशा प्रभावी स्वरुपात देण्यात येते की, त्यांची संपूर्ण विचारसरणी आणि नियम व तत्वे मुस्लिम विद्यार्थ्यांच्या कोऱ्या करकरीत आणि भाबड्या अंत:करणांवर शिक्क्याप्रमाणे चित्रित होतात आणि त्यांचे विचार व बुद्धी पूर्णत: पाश्चात्य संस्कृती व विचारसरणीच्या साच्यात ढाळण्यात येते. एवढेच नव्हे ते विद्यार्थी आपल्या डोक्यातील पाश्चात्य मेंदूनेच विचार करतात आणि पाश्चात्य चष्म्यातूनच पाहतात. हा चश्मा काढला तर त्यांना काहीच दिसत पण नाही. याबरोबरच त्यांची अशी पक्की धारणा आणि प्रवृत्तीच बळावते की, या जगामध्ये बुद्धीशी सुसंगत आणि तत्त्वनिष्ठ व प्रतिष्ठित बाब केवळ तीच असू शकते की, जी पाश्चात्य नियम व तत्त्वांशी सुसंगत व एकरुप आहे. हे झाल्यावर या अनुभवांना आपल्या विद्यापीठात शिकविण्यात येणाऱ्या अभ्यासक्रमाने आणखीनच जास्त बळ मिळते. आपले पोषाख, सामाजिकता, शिष्टाचार व नीतीमत्ता,

यापैकी अशी कोणती बाब आहे की, जिच्यावर पाश्चात्य सभ्यता व संस्कृती आणि पाश्चात्य प्रवृत्तीचा पूर्णपणे प्रभाव नाही? मुस्लिम विद्यापीठाचे पूर्ण नसले तरी पंच्यान्नव टक्के वातावरण हे पाश्चात्यच आहे. अशा वातावरणाचे जे परिणाम अथवा दुष्परिणाम होतात, ते आपल्या सर्वांनाच चांगल्यारीतीने माहीत आहे.

याच्या तुलनेत इस्लामी घटक अतिशय प्रभावहीन व कमकुव्वत आहे. आधीच हा घटक आपली राजकीय शक्ती आणि सांस्कृतिक शक्ती हरवून कमकुव्वत झालेला आहे. मग आपल्या या विद्यापीठात याचे शिक्षण ज्या पुस्तकांतून देण्यात येते ती पुस्तके अगदीच प्राचीन काळात लिहिली गेली आहेत. त्यांचे लिखाण, मुद्रण आणि संपादन आधुनिक काळातील विद्यार्थ्यांना आकर्षित करण्यासारखे मुळीच नाही. या पुस्तकांमध्ये इस्लामच्या कायमस्वरुपी आणि अबाधित असलेल्या नियमांना ज्या परिस्थितींत आणि अवस्थांत लागू करण्यात आलेले आहेत, त्या परिस्थिती आणि अवस्थांत आता बराच बदल झालेला आहे. तसेच सध्याच्या काळात ज्या समस्या आणि परिस्थिती निर्माण झाल्या आहेत, त्यावर त्यांना लागू करण्याचे प्रयत्नही झाले नाहीत. एवढेच नव्हे तर या शिक्षणाबरोबर कोणतेच प्रभावी प्रशिक्षण, कोणतेही सजीव वातावरण, कोणतीच कार्यात्मक वर्तणूक आणि प्रचलनसुद्धा नाही. म्हणूनच पाश्चात्य शिक्षणाबरोबर इस्लामी शिकवणीचे हे मिश्रण आणखीनच प्रभावहीन होऊन बसते. अशा प्रकारे या विसंगत आणि बेजोड़ मिश्रणाचा भौतिक परिणाम असा होईल की, विद्यार्थ्यांच्या मनावर, स्वभावावर आणि बुद्धीपटलावर पाश्चात्य घटकाचा मोठा प्रभाव पड़ेल आणि इस्लामी घटक हे केवळ चेष्टा-मस्करीचे तुणतुणे अथवा जास्तीतजास्त भूतकाळातील प्राचीन अवेशेषांचे खंडर सिद्ध होईल.

मी माझ्या या स्पष्ट आणि परखड़ वक्तृत्वावर खेद व्यक्त करतो, परंतु जे काही मला दिसत आहे, त्यास जशास तसे सादर करणे हे माझे कर्तव्यच आहे. माझ्या दृष्टिकोनात मुस्लिम विद्यापीठाचे धार्मिक व भौतिक शिक्षण एकूणरीत्या मी मांडलेल्या दुरावस्थेच्याच स्वरुपाचे आहे. हे शिक्षण मुळातच एका व्यक्तीस पायापासून डोक्यापर्यंत मुस्लिमेतर बनविणारे आहे. मग त्या बिचाऱ्या विद्यार्थ्यांच्या बगलेत धर्मशास्त्राच्या पुस्तकांचा एक संच यासाठी देण्यात येतो की, त्याला मुस्लिमेतर बनविले जाण्याचे खापर तुमच्या माथी कोणी फोडू नये, तसेच तुमच्याच शिकवणीनुसार त्याने स्वत:च हा संच फेकून दिला तर यालासुद्धा तो स्वत:च जबाबदार समजला जाईल. या शिक्षण प्रणालीने जर तुम्ही अशी आशा बाळगत असाल की, यामुळे तुमचा विद्यार्थी मुस्लिम विचारसरणीचा तयार होईल तर समजा तुम्ही एखाद्या चमत्काराचीच आशा बाळगत आहात. कारण तुम्ही ज्या साधनांचा अवलंब केलेला आहे, त्यातून तर भौतिकरीत्या हे साध्य होणे शक्यच नाही. शंभरातून एखादा विद्यार्थी जर इस्लामी विचारसरणीचा तयार झाला तर काम फत्ते झाले, अशातला प्रकार मुळीच नव्हे आणि हा काही

आपल्या विद्यापीठाचा पराक्रम नसून या गोष्टीचा पुरावा आहे की, तो मुळात इब्राहीमी स्वभावावर जन्मलेला असल्याने तो विद्यार्थी आपली श्रद्धा व इस्लाम सुरक्षित ठेवू शकलेला आहे. असे अपवादात्मक विद्यार्थी अलीगढ़ विद्यापीठच काय तर भारताच्या इतर शासकीय विद्यापीठामध्येसुद्धा आणि युरोपच्या अश्लील संस्कृतीमध्ये पण आढळतात. त्यांच्या विद्यापीठांमध्ये तर इस्लामी शिक्षणाचा लवलेशही नसतो.

आता आपण ही शिक्षण प्रणाली तशीच ठेवून केवळ धर्मशास्त्राचा वर्तमान अभ्याक्रम बदलून जास्त शक्तिशाली अभ्याक्रम सामील कराल तर परिणाम केवळ असा होईल की, फिरंगीपण आणि इस्लामशास्त्रात असणारी स्पर्धा ज़ास्त तीव्र होईल. विद्यार्थ्यांचे मेंदू हे दोन अतिविरोधी शक्तींची रणभूमी बनेल. शेवटी विद्यार्थी तीन गटांत विभागतील ते याप्रमाणे, १) फिरंगीपण प्रभावित विद्यार्थी गट. या गटात पाश्चात्याच्या रंगात असो, हिंदी देशभक्त असो की एखादा नास्तिक व साम्यवादी असो. हे सर्व मात्र फिरंगी विचारसरणीने प्रभावित असतील. २) इस्लाम प्रभावित विद्यार्थी गट. या गटातही जास्त तीव्र प्रभावित असतील किंवा कमी प्रभावित असतील. ३) तिसरा गट मात्र विचित्रच असेल. हा गट पूर्णत: मुस्लिमही नसेल आणि पूर्णत: फिरंगीही नसेल. अर्थातच शिक्षणाचा असा (विपरित) परिणामसुद्धा समाधानकारक परिणाम नव्हे. अर्थात जे पाहिजे आहे ते हस्तगत होणार नाही. राष्ट्रीय दृष्टिकोनानुसार अशा प्रकारचे विद्यापीठ योग्य सिद्ध होऊ शकत नाही. उलट नुकसानच उचलावे लागेल. कमीतकमी गरीब मुस्लिमाकरिता तर हा सौदा तोट्याचाच आहे. कारण लाखो रुपयांची अशी टाकसाळ उभी करण्यात आली की ३३ टक्के शिक्के तर नेहमीसाठी वाया जातात व तेहतीस टक्के शिक्के आपल्याच खर्चाने तयार होऊन परक्यांच्या खिशात जाऊन आपल्याच विरुद्ध वापरण्यात येतात.

उपरोक्त तपशीलातून दोन गोष्टी चांगल्याच स्पष्ट होतात. प्रथम ही की शिक्षणात आपसात विरोधी असलेल्या दोन बाबींचा समावेश तात्त्विकरीत्या चुकीचे आहे. द्वितीय असे की, इस्लामच्या हितासाठीसुद्धा अशा बाबी लाभदायक नाहीत. या बाबींच्या स्पष्टीकरणानंतर असे सांगू इच्छितो की, माझ्या दृष्टिकोनानुसार विद्यापीठाची शैक्षणिक नीती (Education Policy) कशी असावयास हवी !

प्रत्येक विद्यापीठ हे एखाद्या संस्कृतीचे सेवक असून त्यास एक विशेष रंग व स्वरुप असते. तसेच हे रंग आणि स्वरुप पूर्णत: विवेकबुद्धीने खोलवर विचार करुन विशेष संस्कृतीनुसार निश्चित करण्यात येते. आता प्रश्न असा आहे की, आपले विद्यापीठ कोणत्या संस्कृतीस खतपाणी घालू इच्छिते. जर संस्कृती ही पाश्चात्य स्वरुपाची असेल तर या विद्यापीठास मुस्लिम विद्यापीठ म्हणणे चुकीचे ठरेल. यामध्ये एखादा इस्लामी विषय ठेवून विद्यार्थ्यांना विनाकारण मानसिक द्वंद्वाच्या आहारी घालू नये. त्याचप्रमाणे जर इस्लामी संस्कृती पाहिजे तर आपणास

विद्यापीठाचे संपूर्ण स्वरुपच बदलावे लागेल आणि अशा पायावार विद्यापीठ उभे करावे लागेल की, सार्वजनिकरीत्या या संस्कृतीच्या स्वभाव गुणविशेष आणि प्रेरणेस एकरूप असेल. याचबरोबर या संस्कृतीची केवळ जोपासनाच न होता तिच्या विकासास खतपाणी घालणारी व्यवस्था असावी व ही संस्कृती खूप शक्तिशाली असावी.

मी वर या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख केलेलाच आहे की, आपले विद्यापीठ हे मुस्लिम विद्यापीठ असूनही ते पाश्चात्य संस्कृतीची दासी बनलेले आहे. अशा या परिस्थितीत केवळ एवढाच बदल करणे की, धर्मशास्त्राचा वर्तमान अभ्यासक्रम बदलून त्यात थोडी वाढ करण्यात यावी, तसेच शिक्षणाच्या इतर सर्वंच विभागात पूर्णत: पाश्चात्य संस्कृतीचा उदेउदे चालू ठेवावा; तरीसुद्धा हे विद्यापीठ 'मुस्लिम विद्यापीठ' आहे म्हणून सांगणे चुकीचे होय. इस्लामच्या वास्तविकतेवर गंभीर विचार केल्यास ही बाब आपोआपच स्पष्ट होते की, धर्मशास्त्राचे शिक्षण आणि वर्तमान भौतिक शिक्षण यांना विभक्त करणे अथवा दोघांना एकत्रित करणे हे दोन्ही प्रकार पार चुकीचे आहेत, यातून काही साध्य होणार नाही. इस्लाम धर्म हा ख्रिस्ती धर्मासारखा मुळीच नाही की ज्यामध्ये पूजाशास्त्र आणि व्यवहारशास्त्र आपसात वेगवेगळे असतात. कारण ख्रिस्ती धर्मात धर्मास सामाजिक व्यवहारातून पृथक करण्यात आले आहे. इस्लाममध्ये असा प्रकार मुळीच नाही. इस्लाम धर्म हा केवळ उपासना आणि कर्मकांडापुरता मर्यादित नसून तो मानवाच्या सर्व व्यावहारिक समस्यांचे मार्गदर्शन करतो. जगातील कोणतेच शास्त्र असे नाही की, ज्या बाबतींत इस्लाम धर्म मार्गदर्शन करीत नसेल. इस्लाम धर्माचा मूळ हेतूच असा आहे की, मानवाने या जगात यशस्वीपणे व शांती आणि समृद्धीने जगण्यासाठी एका अशा प्रणालीचा अवलंब करावा की, त्याने ऐहिक व पारलौकिक जीवनात यशस्वी व्हावे. हा हेतू साधन्यासाठी इस्लाम धर्म मानवाची विचारसरणी, दृष्टिकोन नीटनेटकेंपणाने घड़वितो, तसेच मानवी नैतिकता व आचरणास एका विशेष साच्यात ढाळतो. मानवाचे कर्तव्य व अधिकार निश्चित करुन त्याच्या सामूहिक जीवनाची एक विशेष व्यवस्था प्रदान करतो, मानवाला बौद्धिक, वैचारिक व कार्यात्मक प्रशिक्षण देतो. समाज निर्मितीचे सर्व नियम प्रदान करतो. याच कारणास्तव इस्लामी संस्कृती एक विशेष संस्कृती म्हणून नावारुपास आलेली असून मुस्लिम समाजाचे एका विशिष्ट जनसमूहाच्या स्वरुपात राहणे याचेच द्योतक आहे. अशा परिस्थितीत 'इस्लामी धर्मशास्त्र' हा पारिभाषिक शब्दच अशा वेळी निरर्थक ठरतो जेव्हा जीवन आणि त्याच्या व्यवहाराशी त्याचा संबंध तुटलेला असतो. इस्लामी संस्कृतीसाठी असा धार्मिक विद्वान निरर्थक आहे की, ज्याला इस्लामच्या श्रद्धा आणि नियम तर माहीत आहेत, परंतु यांच्या आधारे ज्ञान व कार्यक्षेत्रात पुढाकार घेणे व जीवनाच्या नेहमी परिवर्तन होणाऱ्या परिस्थितीत त्यांचा वापर करणेच माहीत नाही. त्याचप्रमाणे या संस्कृतीसाठी असा ऐहिक जाणकारसुद्धा निष्कामी आहे की, जो मनामध्ये इस्लामच्या सत्यतेवर विश्वास

आणि श्रद्धा ठेवतो, परंतु इस्लामेतर पद्धतीने विचार करतो, इस्लामेतर दृष्टिने व्यवहार हाताळतो आणि जीवन इस्लामेतर पद्धतीने जगतो. इस्लामी संस्कृती व सभ्यतेच्या झालेल्या ऱ्हासाचे मूळ कारण हेच आहे की, बऱ्याच काळापासून आपल्या समाजात अशाच दोन प्रकारचे विद्वान निर्माण होत गेले आहेत. तसेच ऐहिक ज्ञान-विज्ञान व कार्यात्मक जीवनाशी असलेले धार्मिक ज्ञानाचे नाते संपुष्टात आले आहे. जर आजही तुम्हास वाटत असेल की, इस्लामी संस्कृती पुन्हा विकसित व्हावी आणि जगाच्या नेतृत्वाची तिने धुरा सांभाळावी तर हे संपुष्टात आलेले नाते पुन्हा जोडावे लागेल. मात्र हे नाते जोडण्याची पद्धत ही नव्हे की, धर्मशास्त्राच्या अभ्यासक्रमास शिक्षण शरीराच्या गळ्यातील अथवा कंबरेतील दागिना बनवावे. तर यास संपूर्ण शिक्षण व प्रशिक्षण व्यवस्थेत अशा प्रकारे एकरुप व्हावे की, हे शिक्षण व प्रशिक्षण विद्यार्थ्यांच्या रक्तातून धमण्यांमध्ये प्रवाहित व्हावे. त्याचा आत्मा, दृष्टि व दृष्टिकोन, श्रवण आणि विचारबुद्धी, भावना आणि विवेकशीलता वगैरे सर्वस्वी तेच असावेत. त्याचप्रमाणे पाश्चात्य विद्या आणि कौशल्यातील संपूर्ण चांगल्या बाबीं स्वीकारुन त्यांना आपल्या उच्चतम संस्कृतीचा अंश बनवावे. अशा तऱ्हेने आपण मुस्लिम तत्वज्ञ (फिलॉस्फर) मुस्लिम वैज्ञानिक, मुस्लिम अर्थतज्ञ, मुस्लिम विचारवंत आणि मुस्लिम संशोधक या विद्यापीठातून निर्माण करावे. अशा प्रकारचे निर्माण केलेले विद्यार्थी जीवनातील प्रत्येक क्षेत्रात अगदी इस्लामी दृष्टिकोनानुसार प्रत्येक समस्येचे समाधान करतील. वर्तमान संस्कृतीच्या विकसित साधन व माध्यमांच्या आधारे इस्लामची सेवा करून इस्लामी विचारसरणी आणि इस्लामी जीवनविधीस वर्तमान व आधुनिक प्रणालीनुसार पुनर्संपादित करतील, इथपावेतो की इस्लाम धर्मास नव्या दमाने परत प्रत्येक क्षेत्रात त्याच नेतृत्वाचे आणि मार्गदर्शनाचे स्थान प्राप्त होईल ज्याकरिता वस्तुत: त्याचे जगात अस्तित्व साकारले गेलेले आहे.

ही आहे ती मूळ संकल्पना, जी मुस्लिमांच्या आधुनिक शैक्षणिक नीतीची मूळ संकल्पना असावयास हवी. जग या स्थानाच्या कितीतरी पुढे गेले आहे. आपण मात्र अजूनही 'सर सय्यद' यांनी जेथे सोडले होते, तेथेच ताटकळलेलो आहोत. आता जर आणखीन काही क्षण जरी येथेच राहिलो तर एका मुस्लिम समूहाच्या नात्याने विकास करणे दूरच, जीवंत राहणेही अशक्य होऊन जाईल.

## क्रमांक दोन

आता मी आपल्यासमोर स्पष्ट करु इच्छितो की, मी ज्या शिक्षणनीतीची चर्चा केली आहे, तिला वास्तविक स्वरुप कसे देता येईल.

१) मुस्लिम विद्यापीठाच्या हद्दीतून फिरंगीपणा व फिरंग्यांच्या संस्कृतीचा समूळ नायनाट करणे अतिशय आवश्यक आहे. जर आपणास आपल्या राष्ट्रीय संस्कृतीचा गळा घोटून तिला ठार

करायचे नसेल तर आपले हे परम कर्तव्य आहे की, आपल्या नवीन पिढीतून फिरंगी संस्कृती पार नष्ट करावी. मुळातच फिरंगी संस्कृतीचे मूळ हे गुलामगिरीच्या विचारसरणीत आणि न्यूनगंड असलेल्या विचारसरणीत (Inferiority Complex) फोफावलेला आहे. मग जेव्हा हिचे कार्यात्मक प्रकटीकरण हे संस्कृती, वर्तणूक आणि सामान्यत: संपूर्ण सामूहिक वातावरणात होत जाते, तेव्हा ते आंतरिक आणि बाह्यात्मक या दोन्ही बाजुंना प्रदूषित करते, तसेच यामध्ये राष्ट्रीय अभिमानाचा अगदी लवलेषही नसतो. मग अशा परिस्थितीत इस्लामी संस्कृतीच्या अस्तित्वाची कल्पनासुद्‌धा शेष राहत नाही. कोणतीही संस्कृती ही केवळ आपल्या नियम आणि मूळ कल्पनांच्या आधारांवर निर्माण होत नसून तिचा कार्यात्मक उपयोग करणे आवश्यक असते. या कार्यात्मक प्रयोगातूनच तिचा योग्य विकास होत असतो. कार्यात्मक प्रयोग न झाल्यास संस्कृती आपोआप नष्ट होते, एवढेच नव्हे तर तिचे काल्पनिक अस्तित्वसुद्‌धा नष्ट होते; म्हणून सर्वप्रथम याच गोष्टीची आवश्यकता आहे की, विद्यापीठात एक सजीव इस्लामी वातावरणाची निर्मिती करण्यात यावी. यातून अशी सुधारणा व प्रशिक्षण घडविण्यात यावे की, ज्यामुळे मुस्लिमांच्या नवीन पिढीस आपल्या राष्ट्रीय संस्कृतीचा अभिमान वाटावा. त्यांच्यात आपल्या राष्ट्रीय संस्कृतीविषयी आदर आणि अपार स्नेह व आकर्षण निर्माण व्हावे. त्यांच्यात इस्लामी नीतीमत्ता आणि इस्लामी जीवनशैलीचा आत्मा निर्माण करण्यात यावा. त्यांच्यात या गोष्टीची पात्रता निर्माण करावी की, त्यांनी आपली विद्‌वत्ता आणि प्रशिक्षित वैचारिक बुद्‌धीने आपल्या राष्ट्रीय सभ्यता व संस्कृतीस विकासाच्या चंद्रावर घेऊन जावे.

२) इस्लामी प्रेरणा निर्माण करणे हे शिक्षक वर्गाच्या ज्ञान व वर्तनांवर बऱ्याच प्रमाणावर अवलंबून असते. जे शिक्षकजण स्वत:च या बाबींनी वंचित आहेत व त्यांची कथनी व करणी या दोन्हीं बाबीं इस्लामविरोधी आहेत, अशा शिक्षकांच्या प्रशिक्षणार्थ्यांमध्ये इस्लामी प्रेरणा निर्माणच कशी काय होणार? तुम्ही केवळ इमारतीचा नकाशा बनवू शकता, परंतु मूळ कारागीर तुम्ही नसून ते शैक्षणिक वर्गाचे सभासद अर्थात शिक्षक आहेत. फिरंगी गवंड्यांकडून या गोष्टीची अपेक्षा बाळगणे की ते इस्लामी प्रकारची इमारत तयार करून देतील; हे असेच आहे की जसे कारल्याच्या वेलीला द्राक्षे लागण्याची अपेक्षा करणे होय. केवळ धर्मशास्त्राचे विषय शिकविण्यासाठी काही 'मौलवी' प्रकारचे शिक्षक नियुक्त करणे म्हणजे अशा परिस्थितीत अगदी निरर्थक ठरेल की, जेव्हा इतर संपूर्ण शास्त्रे शिकविण्याकरिता इस्लामेतर विचारसरणीचे शिक्षक असतील तर मग ही परिस्थितीच आवाक्याबाहेरची असेल. कारण हे इस्लामेतर विचारसरणीचे शिक्षक जीवन व त्याच्या प्रकरणांबाबतीत विद्यार्थ्यांची विचारसरणी व कल्पना इस्लामविरोधी दिशेस नेतील आणि मग यापासून होणाऱ्या तोट्याची भरपाई केवळ धर्मशास्त्राच्या काही विषयांनी मुळीच होणार नाही. कोणतेही कला-कौशल्य असो की, सिद्धान्त असो वा संशोधन असो, अर्थशास्त्र असो वा

विधीशास्त्र असो, इतिहास असो किंवा कोणतेही शास्त्र असो, मुस्लिम विद्यापीठात यापैकी कोणत्याही शास्त्राच्या शिक्षणासाठी केवळ या शास्त्रात पारंगत असणे पुरेसे असून चालणार नाही, तर यासाठी तो शिक्षक पूर्ण व पक्का मुस्लिमही असावयास हवा. अर्थातच या शिक्षक अथवा अधिव्याख्यातास या गोष्टीची पूर्णत: जाणीव असावी की या विद्यापीठाचा मूळ हेतु इस्लामी संस्कृतीचा विकास होय.

३) विद्यापीठात 'अरबी भाषा' हा विषय अनिवार्य (Compulsory) करण्यात यावा. ही आपल्या संस्कृतीची भाषा आहे. इस्लामच्या मूळ स्त्रोतापर्यंत पोहोचण्यात हा एकमेव मार्ग होय. जोपर्यंत मुस्लिमांचा सुशिक्षित वर्ग हा कुरआन आणि प्रेषित प्रणालीपर्यंत प्रत्यक्षपणे पोहोचत नाही, तोपर्यंत त्यास इस्लामचा आत्मा कळणार नाही. इस्लाम समजून घेण्यासाठी त्यास नेहमीच भाषांतरांवर अवलंबून राहावे लागेल, म्हणून त्यास अरबी भाषा शिकून घेणे खूप आवश्यक आहे. आज सुशिक्षित असलेला मुस्लिम समाज इस्लामी नियमांत अशा प्रकारच्या चुका करीत आहे की त्याला पाहून असे वाटते की, त्यास इस्लामचे अ ब क ड सुद्धा माहीत नाही. याचे मूळ कारण हेच आहे की त्यांना कुरआन व प्रेषित चरित्राचा अभ्यास करण्याचे मूळ साधण असलेली अरबी भाषा समजत नाही. पुढे चालून जेंव्हा 'प्रोव्हेंशियल ॲटॉनॉमी' च्या काळात भारताच्या विधानपरिषदेस कायदा निर्मितीचे वाढीव अधिकार प्राप्त होतील, तसेच 'सोशल रीफॉर्म' (Social Reform) करिता नवीन कायदे निर्माण करण्यात येतील; अशा वेळी इस्लामशी अनभिज्ञ असलेले आणि पाश्चात्य नीती व संस्कृतीवर श्रद्धा ठेवणारे लोक जर मुस्लिमांचे प्रतिनिधित्व करीत असतील, तर आधुनिक विधी निर्मितीत मुस्लिमांमध्ये 'सोशल रिफॉर्म' होण्याऐवजी उलटस्वरुपी 'सोशल डीफॉर्म' निर्मितीच होईल आणि मुस्लिमांची सामूहिक व्यवस्था आपल्याच नियमांना सोडून देईल. म्हणून अरबी भाषेस केवळ भाषेपुरते मर्यादित न ठेवता तिला आपल्या विद्यापीठाचा मूळ उद्देश समजावा. अर्थातच जी बाब मूळ उद्देशाशी निगडीत असते, तिचा प्रत्येक परिस्थितीत स्वीकार करणे भागच असते.

४) माध्यमिक शिक्षणाच्या विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमात निम्नलिखित विषयांची प्राथमिक माहिती असावयास पाहिजे.

### अ) श्रद्धाशास्त्र

या विषयात श्रद्धाशास्त्रातील रुक्ष वर्णन न ठेवता श्रद्धाशास्त्राच्या आकलनासाठी अतिशय सोप्या पद्धतीची वर्णणशैली असावी जी स्वाभाविकरीत्या आकलनात यावी. यातून विद्यार्थ्यांना हे ज्ञात व्हावे की, इस्लाम धर्माची श्रद्धा म्हणजेचं या विश्वाच्या मूळ वास्तविकता होय आणि या वास्तविकतांचा मानवी जीवनाशी अतूट संबंध आहे.

## आ) इस्लामी नीतीमत्ता

या विषयात केवळ नीतीमत्तांचे धड़े न देता आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) व त्यांचे अनुयायी, सोबती आणि इतर प्रेषितांच्या जीवनप्रणालीतून काही अशा घटना संपादित कराव्यात की त्यातून विद्यार्थ्यांना ज्ञात व्हावे की, एका मुस्लिमाच्या वर्तनाची (Character) वैशिष्ट्ये काय आहेत आणि मुस्लिमाचे जीवन कसे असावे !

## इ) इस्लामी विधीशास्त्राचे नियम

या विषयात प्रत्येक मुस्लिमासाठी आवश्यक असलेले ईश्वराचे मानवावरील अधिकार आणि मानवाचे मानवावरील अधिकारांबाबतीत इस्लामी विधीशास्त्राचे अनिवार्य व आवश्यक असलेले नियम शिकविण्यात यावेत. विद्यार्थ्यांना हे ज्ञात करावे की, इस्लाम धर्माने आपल्याकरिता वैयक्तिक आणि सामूहिक जीवनासाठी कशा प्रकारचा कार्यक्रम आखलेला असून त्यानुसार कशा प्रकारे एका प्रामाणिक समाजाची निर्मिती होते.

## ई) इस्लामी इतिहास

हा विषय केवळ प्रेषित मुहम्मद (स) आणि त्यांच्या अनुयायी सोबत्यांच्या इतिहासापुरताच मर्यादित असावा. या विषयातून असे अभिप्रेत आहे की, विद्यार्थ्यांना आपल्या मूळ धर्म व मूळ राष्ट्रीयत्वाची जाणीव निर्माण होऊन त्यांच्या अंत:करणात इस्लामी अभिमान जागृत व्हावा.

## उ) अरबी भाषाशास्त्र

अरबी साहित्याशी संबंधित असलेले अरबी भाषेचे प्राथमिक ज्ञान या विषयात असावे.

## ऊ) कुरआन

विद्यार्थ्यांना न अडखळता कुरआन सहजतेने वाचता येऊन त्यातील सोप्या आयतींचे आकलन व्हावे, तसेच काही सूरती मुखपाठ व्हाव्यात.

५) महाविद्यालयीन शिक्षणात सर्व विद्यार्थ्यांना सामान्य असलेला एक अभ्यासक्रम असावा. या अभ्यासक्रमात निम्नलिखित विषय असावेत.

## अ) अरबी भाषा शास्त्र

कनिष्ठ महाविद्यालयामध्ये अथवा उच्च माध्यमिक (Intermidiate) मध्ये अरबी साहित्याचे मध्यम दर्जाचे शिक्षण देण्यात यावे. वरिष्ठ महाविद्यालयात गेल्यावर हे अरबी साहित्य कुरआनासहित शिकविण्यात यावे.

## आ) कुरआन

कनिष्ठ महाविद्यालयात विद्यार्थ्यांत कुरआन आकलनासाठी आवश्यक असलेली पात्रता निर्माण करावी. याप्रसंगी केवळ काही आवश्यक असलेल्या बाबी शिकविण्यात याव्यात. उदाहरणार्थ : कुरआन हे सुरक्षित असणे व ती दैवी वाणी असण्याची वास्तविकता, सर्व धर्मांच्या मूळ ग्रंथांच्या तुलणेत दिव्य कुरआन श्रेष्ठ असणे, दिव्य कुरआनाचे अप्रतिम क्रांतिकारी शिक्षण आणि हे शिक्षण केवळ अरब अथवा मुस्लिमांपुरतेच मर्यादित नाही. संपूर्ण जगातील सिद्धान्त जीवनविधीवर कमालीचा प्रभाव, कुरआनाची वर्णणशैली आणि प्रमाणसिद्धता, दिव्य कुरआनचा वास्तविक मुद्दा इ. विषय.

बी.ए. मध्ये दिव्य कुरआनचे शिक्षण देण्यात यावे. या ठिकाणी शिक्षणपद्धती अशी असावी की, विद्यार्थ्यानी स्वत:हून वाचन करुन समजण्याचा प्रयत्न करावा. तसेच शिक्षकांनी विद्यार्थ्यांना येणाऱ्या अडचणी दूर कराव्यात. अशा प्रकारे दोन वर्षांत सहजपणे दिव्य कुरआनचे विद्यार्थ्यांना आकलन होईल.

## इ) इस्लामी शिक्षण

या विषयानुसार विद्यार्थ्यांना संपूर्ण इस्लामी व्यवस्थेचे आकलन होणे आवश्यक आहे. इस्लामचा पाया ज्या मूळ संकल्पनांवर आधारित आहे, त्या संकल्पनांवर विद्यार्थ्यांना नीतीमत्ता आणि जीवनप्रणालीची रचना करणे, या समाज जीवनव्यवस्थेस संस्कृती, राज्य व अर्थव्यवस्था आणि आंतरराष्ट्रीय संबंधी वापरण्याचे नियम तयार करणे, त्याच्या सामूहिक व्यवस्थेत व्यक्ती आणि समूहांदरम्यान अधिकार व कर्तव्यांची विभागणी करण्याची पद्धत तयार करणे वगैरे ज्ञात होणे आवश्यक होय. ईश्वराने घालून दिलेल्या मर्यादा, या मर्यादांच्या आत मुस्लिमास विचार व कार्याचे स्वातंत्र्य, सीमा व या सीमांचे उलंघन केल्यास इस्लामी व्यवस्थेवर पड़णारा प्रभाव, या समस्त बाबीं उत्तमप्रकारे अभ्यासक्रमात असाव्यात. हा अभ्यासक्रम तीन ते चार वर्षांच्या टप्प्यांत व्यवस्थितपणे विभागण्यात यावा.

६) सामान्य अभ्यासक्रमानंतर इस्लामी ज्ञान-विज्ञानास विभागून विभिन्न ज्ञान-विज्ञानास संक्षिप्त शिक्षणात ठेवण्यात यावे. तसेच प्रत्येक ज्ञानकौशल्यात याच कौशल्यानुसार इस्लामी शिक्षण जोडण्यात यावे. पाश्चात्य ज्ञानविज्ञान सर्वच फायदेशीर असून इस्लाम धर्मास या ज्ञान विज्ञानाशी काहीच वावगे नसून माझे तर असे प्रांजळ मत आहे की, इस्लाम धर्मच हा विद्येचा खरा मित्र आणि विद्या ही इस्लामची मित्रच आहे. वैरभावाचा जेथे प्रश्न येतो तेथे विद्येचा काहीच संबंध नाही. अर्थातच इस्लामचे वैर विद्येशी मुळीच नसून पाश्चात्य संस्कृतीशी आहे. बऱ्याच विद्यां-

विषयांमध्ये पाश्चात्यजण आपल्या काहीं विशेष मूळ कल्पना, मूळ विचारसरणी, प्रारंभ बिंदू (Starting Points) आणि दृष्टिकोन ठेवतात. या बाबीं स्वत:हून प्रमाणसिद्ध वास्तविकतांशी संबंधीत नसून त्या केवळ त्यांचा कल्पनाविलास होय. ते विद्यांना आपल्या कल्पनाविलासाच्या साच्यात ढाळू इच्छित असतात व यावरूनच ते एका विशेष जीवनव्यवस्थेची निर्मिती करतात. इस्लाम धर्मास प्रमुखता याच भोंगळ कल्पनाविलासाशी वावगे आहे. आता ही बाब लक्षात घेण्याचा प्रयत्न करावा की, इस्लामी दृष्टिकोनानुसार पड़केपणा आणि ऱ्हासाचे हे मुळीच कारण नाही की, तुम्ही पाश्चात्य ज्ञानातून वास्तविकता घेत आहात. तर त्याचे मूळ कारण म्हणजे तुम्ही स्वत:च विद्यार्थ्यांच्या आणि कोऱ्या बुद्धींच्या विद्यार्थ्यात पाश्चात्यांच्या मूळ कल्पना रुजवितात. त्यांच्या दृष्टिकोनाचा 'फोकस' (Focus) पाश्चात्य दृष्टिकोनाच्या दिशेस वळवितात. प्रमाणसिद्धता आणि साकल्यबुद्धी करिता पाश्चात्यांनी स्वीकार केलेलेच आरंभबिंदू विद्यार्थ्यांना देण्यात येतात. त्याचप्रमाणे समस्त ज्ञानात्मक वास्तविकता आणि समस्यांना पाश्चात्यांच्याच शैलीवर संपादित करीत असतात. ह्या सर्व कुरापती रचल्यानंतर तुम्हास कसे काय वाटते की, एकट्या इस्लामी धर्मशास्त्राचा विषय शिकून विद्यार्थ्यांनी मुस्लिम व्हावे. हे शक्यच कसे आहे? त्या एकुलत्या एक धर्मशास्त्राच्या विषयामुळे काय होणार की ज्यामध्ये केवळ एक कल्पना असून ज्ञानात्मक वास्तविकता आणि जीवनाच्या प्रश्नांशी यांचा सूतभरही संबंध येत नसावा. उलट विद्यार्थ्यांच्या बुद्धीत आणि विचारसरणीत माहितींची रचनाच मुळात या कल्पनांच्या अगदी विरोधात आहे. हेच मार्गभ्रष्टतेचे मूळ स्त्रोत आहे. जर तुम्हास ही मार्गभ्रष्टता नष्ट करायची असेल तर ह्या मूळ स्त्रोताच्या उगमस्थानी जाऊन त्याची दिशा दिव्य कुरआनच्या मार्गदर्शनाच्या दिशेकडे वळविण्यात यावी. तसेच सर्वच ज्ञान विभागांना दिव्य कुरआनने प्रदान केलेला दृष्टि बिंदू, व दृष्टिकोन देण्यात यावा. ज्या वेळी या संशोधनात्मक साच्यानुसार माहिती व ज्ञान संपादित होईल आणि या विचारसरणीच्या आधारे जीवनाच्या समस्यांचे समाधान होईल तेव्हाच आपले विद्यार्थी हे 'मुस्लिम विद्यार्थी' होतील आणि तुम्ही हे छातीठोकपणे सांगू शकाल की, "आम्ही यांच्यात 'इस्लामी आत्मा' निर्माण केला आहे. नसता एका विभागात इस्लाम व दुसऱ्या विभागात इस्लामेतर ज्ञान ठेवल्यास निश्चितच असा परिणाम होईल की, विद्यापीठातून बाहेर पडलेला विद्यार्थी हा तत्वज्ञान विषयात मुस्लिमेतर, विज्ञान विषयात मुस्लिमेतर, कायदाशास्त्रात मुस्लिमेतर, इतिहासात मुस्लिमेतर, अर्थशास्त्रात मुस्लिमेतर असेल व त्याचा 'इस्लाम' धर्म हा केवळ श्रद्धाशास्त्र आणि काही कर्मकांडाच्या नियमांपुरताच मर्यादित असेल.

७) ज्या ठिकाणी इस्लामी ज्ञानविद्यांच्या विशेष विभागाचा प्रश्न येतो, त्यांत प्रत्येक विभागात

याच्याच बरोबरच्या ज्ञानाच्या पाश्चात्य विभागाच्या अंतिम दर्जाच्या कोर्समध्ये दाखल करावे. उदाहरणार्थ, तत्त्वज्ञानामध्ये इस्लामी तत्वज्ञान आणि इस्लामी तत्त्वज्ञानाचा इतिहास आणि तत्त्वज्ञानीकल उत्क्रांतीमध्ये मुस्लिमांचे योगदान, इतिहासात इस्लामचा इतिहास आणि इस्लामी ऐतिहासिक तत्त्वज्ञान, कायदा व इतिहासात इस्लामी कायद्याचे नियम आणि व्यवहाराशी संबंधित असलेले इस्लामी विधीशास्त्र असावे. अर्थशास्त्र या विषयात अर्थशास्त्राशी संबंधित असलेला इस्लामी विधीशास्त्राचा भाग असावा. त्याचप्रमाणे राज्यशास्त्रात इस्लामी राज्यशास्त्र आणि इस्लामी राज्यशास्त्राची विचारधारा व इतिहास असावा.

८) हे विषय असल्यावर पाश्चात्य विद्यापीठाप्रमाणे इस्लामी शास्त्रावर संशोधन करण्यासाठी विशेष विभाग असावे. या विभागातून इस्लामचा साकल्यपूर्ण विचार करणारे प्रगल्भ विद्वान तयार व्हावेत. या विद्वानांनी केवळ मुस्लिमच नव्हे तर मुस्लिमेतरांनासुद्धा इस्लामी विचारसरणी समजावून देण्यासाठी तयार असावे.

**क्रमांक तीन**

क्रमांक दोनच्या परिशिष्टात शिक्षणाचे जे स्वरुप मी सादर केले, ते वरवर पाहता कदाचित असेही वाटेल की हे लागू करणे अवघड आहे. परंतु मी पूर्ण विचारांतीच हा निर्णय घेतला आहे. थोडेसे कष्ट घेतल्यास आणि थोडासा पैसा खर्च केल्यास हे लक्ष्य गाठणे सहज शक्य आहे.

ही वस्तुस्थिती विसरता कामा नये की, तुम्ही मार्गावर पहिले पाऊल ठेवताच ते अंतिम पाऊल समजू नये. मार्गातील पहिल्या प्रयत्नास अंतिम लक्ष्य समजू नये. कोणतेही लक्ष्य गाठण्यासाठी सुरवात करण्याच्या वेळीच संपूर्ण बाबींची आवश्यकता नसते. सध्या तरी आपणास एका इमारतीचा केवळ पायाच भरावयाचा आहे आणि पायाभरणीसाठी ज्या बाबींची आवश्यकता आहे, त्या बाबी तर उपलब्धही आहेतच. या शिक्षण प्रणालीतून जे विद्यार्थी तयार होतील तेच विद्यार्थीगण पायाभरणीनंतर इमारत उभी करण्याचे काम हाती घेतील. मग त्यानंतरची विद्यार्थ्यांची खेप अंतिम लक्ष्य गाठतील. त्याकरिता या सद्कार्याची मुहूर्तमेढ आत्ताच रोवण्यात यावी. नसता मुहूर्तमेढ रोवण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व बाबीं तुमच्याकडे उपलब्ध असताना हे कार्य झाले नाही तर ते परत कधीच होणार नाही.

या सुधारणावादी कार्याचा सल्ला मी दिल्यामुळे या कार्यास कार्यात्मक स्वरुप देण्याची सूचना देणेसुद्धा माझेच कर्तव्य आहे. म्हणून ही सूचना नीट लक्षपूर्वक ऐका.

१) हायस्कूल शिक्षणासाठी इस्लामी श्रद्धाशास्त्र आणि इस्लामी नीतीमत्ता व इस्लामी विधीशास्त्राचा अभ्यासक्रम निझाम संस्थानाच्या शिक्षण विभागाने तयार केला असून हा अभ्यासक्रम उच्च दर्जाचा आहे.

अरबी भाषाशास्त्राचे शिक्षण जुन्या शिक्षण पद्धतीमुळे जेवढे अवघड होऊन बसले होते, ती पद्धत बदलल्यामुळे ते सुद्धा सोयिस्कर झाले आहे. या नवीन पद्धतीमुळे अरबी भाषाशास्त्राचा अभ्यास बराच सोयिस्कर झाला आहे. यातही आणखीन एक पद्धत अशी अवलंबिण्यात येऊ शकते की, अरबी भाषाशास्त्रात दिव्य कुरआनातीलच अरबी भाषा वापरण्यात यावी. याचा फायदा हा होईल की, कुरआनशास्त्रासाठी वेगळा वेळ देण्याची गरज पडणार नाही. अरबी भाषा शिकताना अगदी सुरुवातीपासूनच विद्यार्थ्यांना दिव्य कुरआनची भाषा अंगवळणी पडेल.

इस्लामी इतिहासावर भरपूर पुस्तिका लिहिल्या गेल्या आहेत. त्यापैकी योग्य पुस्तिका निवडून प्राथमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम तयार करावा.

प्रथमोल्लेखित दोन्ही विषयांच्या तयारीसाठी दिवसाकाठी एक तास पुरेसा आहे. इस्लामी इतिहासाच्या विषयासाठी विशेष वेळ काढण्याची गरज शक्यतो भासणार नाही. सामान्य इतिहासात हा विषय सामील करण्यास हरकत नाही. अशा प्रकारे मला असे वाटते की, हायस्कूलच्या वर्तमान अभ्यासक्रमात काही विशेष बदल करण्याची आवश्यकता नाही. खरा बदल हा शिक्षण पद्धती आणि शिक्षकवर्गात करण्याची वास्तविक गरज आहे. तुमच्या डोक्यात असलेली धर्मशिक्षण आणि धर्मशास्त्रांच्या शिक्षकांची असलेली कल्पनाच प्रथमत: काढून टाकावी. तसेच सद्ध्याच्या विद्यार्थी व विद्यार्थिनींच्या मानसिक व सामाजिक अवस्थेस समजूनच शिक्षण देणारे शिक्षक नियुक्त करावेत. त्यांना हा विकसित अभ्यासक्रम द्यावा आणि याबरोबरच असे वातावरण निर्माण करावे की इस्लाम धर्माचे वृक्ष विकसित होत जावे.

२) महाविद्यालयीन शिक्षणासाठी मी ज्या प्रकारच्या अभ्यासक्रमाची संकल्पना सादर केली, त्याचे प्रामुख्याने तीन घटक आहेत. अ) अरबी भाषाशास्त्र, ब) कुरआन आणि क) इस्लामी शिक्षणशास्त्र. यांपैकी अरबी भाषाशास्त्रास आपण अनिवार्य दुय्यम भाषा विषयाचा दर्जा द्यावा. विद्यार्थ्यांना इतर भाषा अवगत करावयाची झाल्यास त्यांनी ती स्वतंत्ररीत्या करावी. परंतु महाविद्यालयात असलेल्या भाषा माध्यमानंतर दुसरी भाषा ही अरबीच असावयास हवी. अभ्यासक्रम दमदार असला आणि हाडाचा शिक्षकवर्ग असला तर कनिष्ठ महाविद्यालयाच्या द्विवार्षिक सत्रात विद्यार्थ्यात एवढी पात्रता निर्माण करणे सहज शक्य होईल की, ते वरिष्ठ महाविद्यालयात गेल्यावर कुरआनाचे शिक्षण कुरआनाच्याच भाषाशैलीत मिळवू शकतील.

कुरआनच्या शिक्षणासाठी एखाद्या मोठ्या वर्णनात्मक ग्रंथाची गरज नसून एखादा दर्जात्मक कुरआनाचा अभ्यासु आणि आधुनिक शिक्षण पद्धती अवगत असलेला प्राध्यापकही

चालेल. तो आपल्या संभाषणांतून कनिष्ठ महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये कुरआन आकलनासाठी आवश्यक असलेली पात्रता निर्माण करील. मग वरिष्ठ महाविद्यालयात कुरआनचे शिक्षण अशा प्रकारे देईल की, कुरआनसोबतच अरबी भाषाशास्त्राचेही ज्ञान विद्यार्थ्यांना मिळेल. इस्लामी शिक्षण शास्त्राकरिता मी मागे उल्लेख केल्याप्रमाणे या विषयावर एक नवीन पुस्तक लिहिण्याची गरज आहे. या पुस्तकातून एक उद्दिष्ट पूर्ण व्हावे. काही काळापूर्वी या उद्दिष्टपूर्तीसाठी मी स्वत: 'इस्लामी तेहज़ीब और इसके उसूल व मुबादी (उर्दू)' हे पुस्तक लिहिले आहे. हे पुस्तक मी विद्यापीठासाठी अर्पण करण्यास तयार आहे.

या विषयांकरिता महाविद्यालयीन शिक्षणाच्या वर्तमान व्यवस्थेत कोणत्याही बदलाची विशेष गरज भासत नाही. अरबी भाषाशास्त्रासाठी अगदी तेवढाच वेळ पुरेसा आहे, जेवढा वेळ या ठिकाणी 'दुसरी भाषा' विषयास देण्यात येतो. तसेच या ठिकाणी चालू असलेल्या 'धर्मशास्त्र' या विषयास देण्यात येत असलेल्या वेळेतच 'कुरआन' आणि इस्लामी शिक्षणशास्त्र' हे दोन्ही विषय आळीपाळीने शिकविले जाऊ शकतात.

३) दुसऱ्या भागातील सहाव्या क्रमांकात मी सादर केलेली संकल्पना साकारण्यासाठी थोडेसे अवघड होईल. हे काम सोयिस्कर करण्याच्या तीन पद्धती आहेत.

अ) आधुनिक ज्ञान-विज्ञानावर प्रभुत्व असलेले व त्याचबरोबर 'कुरआन' व 'प्रेषित-चरित्रा'चा गाढा अभ्यास असलेले प्राध्यापक नियुक्त करावेत. या प्राध्यापकांत एवढी पात्रता असणे आवश्यक आहे की, पाश्चात्य ज्ञान-विज्ञानाची वास्तविकता व विचारधारापासून विभक्त होऊन इस्लामी नियम आणि विचारधारानुसार संपादित करता यावे.

ब) इस्लामी विधी-सिद्धान्त, विधी-नियम, राज्यशासन, नागरिकशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहासशास्त्र वगैरे बाबतीत अरबी, उर्दू, इंग्रजी, जर्मन आणि फ्रेंच भाषांमध्ये जेवढे काही साहित्य अस्तित्वात आहे, त्याची तपासणी करून उपयोगी असलेली पुस्तके वा ग्रंथ घ्यावे.

क) उपरोक्त विषयांवर आधुनिक ग्रंथ संपादन करणाऱ्या तज्ञ मंडळींची सेवा घेण्यात यावी. विशेषत: इस्लामी विधीशास्त्राचे नियम आणि आदेश, इस्लामी अर्थशास्त्र, इस्लामी नागरिकशास्त्र आणि दिव्य कुरआनाच्या सिद्धान्तावर आधुनिक पद्धतीने ग्रंथ संपादित करण्याची नितांत आवश्यकता आहे. कारण जुनी पुस्तके आणि ग्रंथ वर्तमान शिक्षणासाठी निरुपयोगी आहेत. साकल्यपूर्ण विचार करून निर्णय घेणाऱ्या इस्लामी विद्वानांसाठी निश्चितच या जुन्या ग्रंथामध्ये भरपूर आहे, परंतु वर्तमान विद्यार्थ्यांकरिता काहीच उपयोगाचे नाहीत.

यात शंका नाही की, या तिन्ही पद्धतींचा अवलंब करूनही आपण निश्चित केलेले लक्ष्य पूर्णपणे गाठता येणार नाही. निश्चितच या नवनिर्मितीत बऱ्याच त्रुट्या पण आढळतील. परंतु यांची काळजी करण्याचे काहीच कारण नाही. कारण योग्य मार्गावरील हे पहिले पाऊल होय. यातील राहिलेल्या त्रुटी नंतरची पिढी भरून काढील. एवढेच नव्हे तर या कार्यपूर्तीचे फळ पन्नास वर्षांनंतर चाखायला मिळतील.

४) इस्लामी संशोधन विभाग सुरु करण्याची ही वेळ नाही. या संशोधन विभागाची काही वर्षांनंतर गरज भासेल. याकरिता नंतर विचार करु या.

५) सर मुहम्मद याकूब यांच्या मताशी मी सहमत आहे की, वेळोवेळी धर्मपंडितांना महत्त्वाच्या मुद्दयांवर व्याख्यान देण्याकरिता निमंत्रित करावे. मला तर असे वाटते की, अलीगढ विद्यापीठ हे केवळ भारतच नव्हे तर संपूर्ण जगाचेच ज्ञान, विज्ञान व संशोधन केंद्र व्हावे. भारतच नव्हे तर इजिप्त, सीरिया, ईरान, तुर्की आणि यूरोपच्या मुस्लिम विशारद व पंडितांनासुद्धा व्याख्यानासाठी निमंत्रित करावे. येथे येऊन या विद्वानजणांनी आपले ज्ञान, संशोधन, अनुभव सांगावेत जेणेकरून आपल्या विद्यार्थ्यांत विद्येचा खरा आत्मा जागृत व्हावा.

६) इस्लामी शिक्षणासाठी कोणतीही एकच भाषा विशेष लागू करणे दुरुस्त नाही. उर्दू, अरबी व इंग्रजी यापैकी कोणत्याही एका भाषेत यावेळी अभ्यासक्रमासाठी पुरेसे साहित्य उपलब्ध नाही. म्हणून ज्या भाषेत जी बाब लाभदायक मिळेल तिला त्याच भाषेत अवगत करावे. धर्मशास्त्र आणि इस्लामी शास्त्रांच्या शिक्षकांना अरबी आणि इंग्रजी या दोन्हीं भाषांवर प्रभुत्व असावे.

मी आपल्या भाषण विस्तारावर खेद व्यक्त करीत आहे. परंतु हे विस्तारित भाषण अत्यंत आवश्यक होते. कारण मी अत्यंत नवीन विषयाकडे तुम्हास आमंत्रित करीत आहे. या विषयाच्या आणि मार्गाच्या पाऊलखुणा ओळखण्यासाठी मला खूप काळ विचारमग्न व्हावे लागले. खूप संशोधन करावे लागले. या शिक्षण पद्धतींत क्रांती व बदल आणल्याशिवाय मुस्लिमांचे संस्कृती आणि राष्ट्रीय अस्तित्व अबाधित राहणे शक्य नाही. मला याची पूर्णत: जाणीव आहे की, अलीगढ विद्यापीठातच अशा विद्याविशारदांचा एक मोठा समूह आहे जो माझ्या या शैक्षणिक संकल्पनेस एखाद्या वेड्याचे स्वप्न अथवा कल्पनाविलास समजतील. मला याचे वाईटही वाटणार नाही, तसेच नवलही वाटणार नाही. मागे पाहणाऱ्यांनी भविष्य-काळाकडे पाहणाऱ्यांस खरोखर वेड्यांतच काढले. परंतु जे काही मी आज पाहत आहे, काहीं वर्षांनंतर कदाचित माझ्या जीवनातच हे घडेल की, हे वादळ तुमच्यासमोर संकट बनून उभे ठाकलेले असेल आणि तुमच्यात त्या संकटाचा सामना करण्याची ऐपतही नसेल.

# प्रकरण तिसरे
# मुस्लिमांकरिता आधुनिक शैक्षणिक ध्येय-धोरण

'मुस्लिम विद्यापीठ अलीगढ़'च्या 'धर्मशास्त्र अभ्यासक्रम सुधारणा परिषदेच्या' समस्यांच्या निराकरणास्तव 'मौलाना सय्यद अबुल आला मौदूदी' यांनी सादर केलेली उत्तरे या ठिकाणी देत आहोत. या सदरातील उपयुक्त संभाषण 'मुस्लिम विद्यापीठ अलीगढ़' साठी असले तरी हे मुस्लिमांच्या संपूर्ण शैक्षणिक संस्थांकरिता विशेष उपयुक्त आणि लाभदायक आहे. ज्या शैक्षणिक धोरणाचे स्पष्टीकरण या प्रकरणात करण्यात आले आहे ते धोरण स्वीकारणे मुस्लिम समाजासाठी निश्चितच आवश्यक आहे. मग अलीगढ़ विद्यापीठ असो की 'दारुल उलूम देवबंद' (जि. सहारनपूर) असो, की 'जामिया मिलिया, दिल्ली विद्यापीठ' असो. सर्वच विद्यापीठाचे शिक्षणसत्र वाढीव आहे. परंतु सदरील शैक्षणिक धोरण हे अत्यंत आवश्यक व उपयुक्त होय.

'मुस्लिम विद्यापीठ कोर्ट'चे हे एक अतिशय महान कार्य म्हणावे लागेल की, त्याने आपल्या संस्थेचा मूळ उद्देश, अर्थातच विद्यार्थ्यांमध्ये इस्लाम धर्माची वास्तविक प्रेरणा निर्माण करण्याकडे आपले लक्ष वळविले आणि या मोलाच्या कार्यपूर्तीस्तव या परिषदेची स्थापना केली. यासंबंधी जी पत्रके विद्यापीठ कार्यालयात पाठविण्यात आली, त्यांचा मी सखोल अभ्यास केला. यातून मला हे स्पष्टपणे जाणवले की, इस्लामी धर्मशास्त्राच्या वर्तमान शिक्षण पद्धतीची परिस्थिती खूप दयनीय व असमाधानकारक आहे. सद्ध्याच्या परिस्थितीत शिकविण्यात येणारा अभ्यासक्रम निरर्थक आणि कूचकामी आहे. तरी पण परिषदेच्या सन्माननीय सदरस्यांनी जे प्रश्न उपस्थित केले आहेत, त्यावरून असे लक्षात येते की, परिषद सदस्यांचा मानस हा केवळ अभ्यासक्रमात थोड़ाफार बदल करण्याचा असून त्यांना कदाचित असे वाटते की, अभ्यासक्रमातून काही विषय वगळून काही विषय सामिल करण्यात आलेत तर विद्यार्थ्यांत इस्लामी प्रेरणा निर्माण होईल. जर असे असले तर मी हे स्पष्ट करु इच्छितो की, हा एक मोठा गैरसमज व मूर्खाच्या जगात वावरण्यासम होईल. खरे पाहता या लक्ष्य पूर्तीसाठी आपणास खूप खोलवर विचार करून हे पहावे लागेल की, दिव्य कुरआन प्रेषित वचने, इस्लामी विधीशास्त्र आणि श्रद्धाशास्त्राचे शिक्षण मिळूनही विद्यार्थ्यांत इस्लामी प्रेरणा निर्माण न होण्याची कारणे कोणती आहेत? जर धर्म शास्त्राचे वर्तमान अभ्यासक्रमच त्रुटींनी भरलेले असेल तर या त्रुटीच नष्ट करणे यासाठी पुरेसे ठरेल. परंतु जर याची कारणे याव्यतिरिक्त असतील आणि आपल्या शैक्षणिक धोरणातच मूलभूत बिघाड असेल तर मात्र धर्मशास्त्राच्या अभ्यासक्रमात थोडा फार बदल केल्याने काहीच हाती लागणार नाही. याकरिता आपणास सुधारणांमध्ये बरीच वाढ करावी लागणार आहे. मग याकरिता आपणांस कितीही कष्ट आणि परिश्रम करावे लागले तरी हरकत नाही. मी या समस्येवर सखोल विचार करुन ज्या निर्णयावर पोहोचलो त्यांचे

स्पष्टीकरून देत आहे. माझे हे स्पष्टीकरण तीन परिशिष्टांत देत आहे. पहिल्या परिशिष्टांत विद्यापीठाच्या वर्तमान शैक्षणिक धोरणावर टीकात्मक दृष्टिक्षेप टाकून व त्यातील मूळ कमतरता आणि त्रुटी स्पष्ट करुन हे दाखविण्यात आले की, मुस्लिमांच्या शैक्षणिक हिताकरिता आपले शैक्षणिक धोरण कसे असावे. दुसऱ्या परिशिष्टात सुधारणात्मक धोरणावर प्रकाश टाकण्यात आला असून तिसऱ्या परिशिष्टात ही सुधारणात्मक शैक्षणिक धोरण लागू करण्यासाठी प्रयोगात्मक बाबींवर चर्चा करण्यात आली आहे.

## (पहिले परिशिष्ट)

## वर्तमान शैक्षणिक धोरणातील त्रुटीं व उणिवा

वर्तमान स्थितीतील विद्यापीठातील शिक्षण पद्धती ही आधुनिक शिक्षण आणि इस्लामी शिक्षणाचे असे विचित्र मिश्रण आहे, की ज्यामध्ये कसलीच एकवाक्यता व साधर्म्य नसून या बेजोड़ मिश्रणातील दोन्ही शिक्षण पद्धती आपसात विरुद्ध दिशेच्या आहेत अथवा विस्तव आणि पाण्याचे मिश्रण करण्याचा जबरी प्रयोग करण्यासारखे आहे. या पद्धतींत ही कार्यक्षमताच मुळात निर्माण करण्यात आलेली नाही की, तिचे एखाद्या ऊर्जेत रुपांतर होऊन तिने एखादी संस्कृती विकसित करावी. दोन वस्तुंना एकत्र करुनही हे दोन्ही घटक आपसात केवळ परस्परविरोधीच नसून ते विद्यार्थ्यांच्या बुद्धींत द्वंद्व आणि उपद्रव माजविणारे आहे. एवढेच नव्हे तर त्यांची बुद्धी दोन विरुद्ध दिशांकडे खेचत आहे. इस्लामी विचारधारा बाजुला ठेवून केवळ शैक्षणिक दृष्टिकोनातून जरी पाहिले तरी हे सांगणे आवश्यक ठरते की, शिक्षणांत अशा प्रकारचे विरोधी घटक आणि परस्परविरोधी घटकांचे मिश्रण मुळात अतिशय घातक ठरते.

इस्लामी धोरणानुसार तर ही पद्धत अत्यंत धोकादायक व विलक्षण घातक ठरते. कारण प्रथमत: अशी संमिश्र शिक्षण पद्धतीच चुकीची आहे. आणखीन त्यात या संमिश्र घटकांत साम्य व समतोल नसल्याने खूपच घातक आहे. कारण या मिश्रणात पाश्चात्य घटकाचे प्रमाण वाढीव आणि जास्त प्रभावशाली असून इस्लामी घटक त्याच्या तुलनेत खूप कमकुवत आहे. पाश्चात्य घटकास पहिला लाभ असा आहे की, मुळात तो घटक एक आधुनिक घटक असून त्याच्या पाठीशी एका जागतिक संस्कृतीची शक्ती आहे. तसेच तो आपल्या विद्यापीठाच्या शिक्षणात इतर विद्यापीठांप्रमाणेच संपूर्ण वैभवासहित आणि सर्व शक्तीनिशी चालू आहे. कारण पाश्चात्य संस्कृतीची जोपासना आणि विकास करण्यासाठी पाश्चात्यांनी सर्व शक्ती पणाला लावली आहे. पाश्चात्य शिक्षणाचा विद्यार्थ्यांच्या विचारसरणीवर विलक्षण पगड़ा आहे. त्याच्या प्रभावामुळे विद्यार्थ्यांचा संपूर्ण दृष्टिकोनच पाश्चिमात्य झालेला असतो. तसेच एखाद्या श्रद्धेप्रमाणे त्यांच्या मानसिकतेचे पाश्चात्यकरण होत जाते. त्यांच्या दृष्टिकोनात प्रत्येक प्रतिष्ठित आणि योग्य व आधुनिक आणि लाभदायक व प्रमाणसिद्ध बाब ही पाश्चात्यच ठरते. मग आपल्या विद्यापीठात

दिले जाणारे शिक्षण म्हणजेच जळत्या कोलीतावर तेल टाकण्याचे काम करते. अर्थात पाश्चात्य विचारसरणी अधिक शक्तिशाली बनते. पोषाख, संस्कृती, सभ्यता, वर्तन, चालीरीती यापैकी कोणती बाब पाश्चात्य पद्धतीच्या प्रभावाच्या कचाट्यातून सुटलेली आहे? आपल्या विद्यापीठातच पाहिले तरी ५५ टक्के वातावरण हे पाश्चात्य प्रभावित आहे. अशा वातावरणाचे झालेले आणि होणारे परिणाम कसे घृणास्पद आहेत, ते सर्वांनाच माहीत आहेत. याच्या तुलनेत इस्लामी घटक हा अतिशय दुर्बल आणि प्रभावहीन आहे. आधीच हा घटक राजकीय व सामाजिक शक्ती हरवून बसला व आणखीनच शक्तीहीन व प्रभावहीन झाला. मग आपल्या विद्यापीठात या घटकाचे ज्या पद्धतीने शिक्षण देण्यात येत आहे, ती पद्धती खूप जुनाट व गंजलेली आहे. या शैक्षणिक ग्रंथांची संपादन शैली पण अतिशय जुनी असल्याने संपादनशैलीच्या आधुनिक पद्धतींच्या तुलनेत ती खूप मागे आहे. या ग्रंथांची भाषाशैलीसुद्धा प्राचीन आहे. या सर्व जुनाट आणि कूचकामी शैली आधुनिक शिक्षण पद्धतीच्या शैलीच्या तुलनेत शतकानुशतके मागे असल्याने विद्यार्थ्यांवर याचा विचित्र परिणाम होतो आणि शिक्षणाचा मूळ उद्देश साध्य होत नाही. एकूणरीत्या ही जुनाट शिक्षण पद्धती व ग्रंथ रचना आधुनिक बुद्धीला पटत नाही. यामध्ये इस्लामच्या चीरयौवनी असलेल्या नियमांना ज्या परिस्थितीत लागू करण्यात आले आहे, त्या परिस्थितीत आता बराच बदल झाला आहे. तसेच जी परिस्थिती आता उद्‌भवलेली आहे आणि ज्या समस्या सद्यस्थितीत उभ्या राहिलेल्या आहेत, त्यांचा विचार त्या काळी झालेला नसल्याने ते नियम लागू करण्याचा विचार झालेला नाही. एवढेच नव्हे तर या शिक्षणशैलीचा कार्यात्मक जीवनात वापर झालेला नाही. अशा प्रकारे पाश्चात्य शिक्षणासोबत असलेले इस्लामी लुळेपांगळे विषय जास्तच कमकुवत आणि प्रभावहीन आहेत. अशा प्रकारच्या असमान प्रमाणाच्या मिश्रणाचा भौतिक परिणाम असा होतो की विद्यार्थ्यांच्या मानसिकतेवर आणि विचारसरणीवर पूर्णपणे पाश्चात्य संस्कृतीचाच विलक्षण पगड़ा बसतो आगि इस्लामी शिक्षणाची अवस्था अत्यंत दयनीय व हास्यास्पद होऊन बसते.

मी माझ्या स्पष्ट वक्तृत्वाबद्दल माफीचा इच्छूक आहे. परंतु मी जी भयानक वस्तुस्थिती पाहात आहे, ती जशीच्या तशी आपणासमोर मांडणे आपले कर्तव्य समजतो. माझ्या निरीक्षणानुसार मुस्लिम विद्यापीठाच्या धार्मिक व भौतिक शिक्षण पद्धतीचे उदाहरण असे देता येईल की, समजा तुम्ही एका व्यक्तीस पायापासून डोक्यापर्यंत मुस्लिमेतराच्या स्वरुपात दर्शवितात. मग त्याच्या काखेत इस्लामी धर्मशास्त्राच्या काही पुस्तकांचा संच देत जेणेकरून त्यास मुस्लिमेतर बनविण्याचे खापर कोणी तुमच्या माथी फोडू नये. जर (तुमच्याच शिक्षण पद्धतीने प्रभावित होऊन) त्याने ते दप्तर फेकून दिले तर याचेही खापर त्याच्या स्वत:च्याच माथी फोड़ावे. या शिक्षणशैलीतून जर तुम्ही ही आशा बाळगत असाल, की यातून विद्यार्थी हा पूर्णपणे

मुस्लिम स्वरुपाचा निर्माण व्हावा तर हा चमत्कारच समजावा लागेल, कारण या आशापूर्तीस्तव तुम्ही ज्या साधनांचा वापर करीत आहात, त्या साधनांतून भौतिकरीत्या असा कोणताच परिणाम समोर येणार नाही. अर्थाथच हे बाभळीचे बी पेरून आंबे अथवा द्राक्षे मिळण्याची आशा बाळगण्यासारखे होईल. एक दोन टक्के विद्यार्थी वैचारिक व श्रद्धात्मकरीत्या मुस्लिम स्वरुपाचे तयार झाल्यास समाधान मानणे चुकीचे आहे. एक दोन टक्केच विद्यार्थ्यांचे वैचारिक व श्रद्धात्मक मुस्लिम स्वरुपाचे विद्यार्थी विद्यापीठात जर तयार होत असतील तर हा मुळात या गोष्टीचा पुरावा आहे, की हे मुस्लिम स्वरुपाचे विद्यार्थी आपल्या विद्यापीठाच्या शिक्षण व प्रशिक्षणाच्या आधारावर मुळीच तयार झाले नसून ते 'इब्राहीमी' स्वभावाचे (नैसर्गिक स्वभावाचे) द्योतक होय. असे अपवादात्मक विद्यार्थी केवळ आपल्या या मुस्लिम विद्यापीठातच नव्हे तर यूरोपच्या इस्लामविरोधी विचारसरणीच्या विद्यापीठांतसुद्धा आढळतात.

एवढे असूनही आपण जर आपला अभ्यासक्रम जशास तसाच ठेवून केवळ इस्लामी धर्मशास्त्राच्या अभ्यासक्रमातच बदल घडवून त्यात थोडा जास्त प्रखर स्वरुपाचा अभ्यासक्रम सामील केला तर याचा परिणाम हा केवळ एवढाच मात्र होईल, की फिरंगी विचारसरणी आणि इस्लामी विचारसरणी दरम्यान सुरु असलेली यादवी आणखीन जास्त तीव्र होईल. प्रत्येक विद्यार्थ्याची विचारबुद्धी हे दोन परस्परविरोधी विचारसरणीची समरभूमी बनेल परिणामी विद्यार्थीजन हे तीन समूहांत विभागले जातील. प्रथम समूहाच्या विद्यार्थ्यांवर फिरंगी विचारसरणीचा विलक्षण प्रभाव असेल. मग तो प्रभाव इंग्रजी स्वरुपाचा असो वा हिंदी देशभक्ती स्वरुपाचा असो अथवा साम्यवादी स्वरुपाचा असो. दुसऱ्या समूहातील विद्यार्थी हे इस्लामी विचारसरणीने प्रभावित असतील. मग हा प्रभाव प्रखर असो वा फिरंगी विचारसरणीने प्रभावित असलेल्या फिक्या स्वरुपाचा असो. तिसऱ्या समूहातील विद्यार्थी मात्र पूर्णत: मुस्लिमही नसतील आणि पूर्णत: फिरंगी स्वरुपाचेही नसतील. अर्थातच शिक्षणाचा हा परिणामसुद्धा योग्य नाही. हे शैक्षणिकदृष्ट्यासुद्धा या परस्परविरोधी घटकांचे मिश्रण योग्य ठरणार नाही आणि राष्ट्रहितासाठीसुद्धा योग्य ठरणारे नाही. अशी शिक्षणशैली असलेले विद्यापीठ हे कधीच योग्य असण्याचा दावा करु शकत नाही. कारण अशा शिक्षण प्रणालीचे दोन तृतीयांश परिणाम हे राष्ट्रीय हितांविरुद्ध आणि राष्ट्रीय संस्कृतीसाठी घातक आहे. सरतेशेवटी बिचाऱ्या गरीब आणि पामर मुस्लिमांसाठी तर हे निश्चितच विघातक आहे कारण लाखो रुपये खर्च करूनही तेहतीस टक्के खोटी नाणी तयार करणारे, आणि तेहतीस टक्के निर्मितीवर खर्च होणारे आणि तेहतीस टक्के नाणी आयतेच परक्यांच्या झोळीत टाकणारे व आपल्याच विरुद्ध वापरले जाणारे पैसे तयार करण्याचे टकसाळ आपण उभे केलेले आहे.

उपरोक्त चर्चेतून दोन गोष्टी चांगल्या प्रकारे स्पष्ट होतात. प्रथम ही की, शिक्षणात परस्परविरोधी घटकांचे मिश्रण हे चुकीचे आणि घातक सिद्ध होते. दुसरी गोष्ट अशी,

इस्लामच्या हितामध्येसुद्धा अशा स्वरुपाचे मिश्रण केवळ अलाभदायकच नसून नुकसानकारक ठरते, मग यामध्ये असमान प्रमाणात घटक असो अथवा समान प्रमाणात घटक असो, या बाबींच्या स्पष्टीकरणानंतर मी सांगू इच्छितो की, माझ्या दृष्टिकोनानुसार विद्यापीठाचे शैक्षणिक धोरण कसे असावे.

ही बाब स्पष्ट आहे की, प्रत्येक विद्यापीठ हे कोणत्या न कोणत्या संस्कृतीची सेवा आणि जोपासना करीत असते. प्रत्येक विद्यापीठातील शिक्षण हे एका विशेष रंग व स्वरुपाचे असते. तसेच या रंग व स्वरुपाची निवड पूर्ण विचारांतीच एका विशेष संस्कृतीनुसार केली जात असते. प्रश्न असा आहे की, आपल्या विद्यापीठात कोणती संस्कृती जोपासायची आहे आणि येथील शिक्षणाचे रंग व स्वरुप कशा प्रकारचे असावयास हवे? त्याचप्रमाणे हे विद्यापीठ कोणत्या संस्कृतीच्या सेवेसाठी उभारण्यात आले आहे? जर पाश्चात्य संस्कृती असेल तर यास 'मुस्लिम' विद्यापीठ मुळीच म्हणता येणार नाही. अशा विद्यापीठात धर्मशास्त्राचे विसंगत स्वरुपाचे असलेले अभ्यासक्रम ठेवून विद्यार्थ्यांना मानसिक द्वंद्वाच्या खाईत लोटून काहीच साध्य होणार नाही. तसेच जर या विद्यापीठात इस्लामी संस्कृती जोपायसायची असेल तर आपल्याला या विद्यापीठांची पूर्ण रुपरेखाच बदलावी लागेल. तसेच ही रुपरेखा सामान्यत: या संस्कृतीशी आणि इस्लामी आत्म्याशी सुसंगत असावी. त्याचप्रमाणे यात विकास घडविण्याचा मार्ग वास्तविक स्वरुपाचा असावा.

मी वरील मजकुरात स्पष्ट केल्याप्रमाणे वर्तमान परिस्थितीत आपले हे विद्यापीठ इस्लामी संस्कृतीशी संबंधित मुळीच नसून ते पाश्चात्य संस्कृतीच्या सेवा व विकासासाठीच आहे. अशा स्थितीमध्ये धर्मशास्त्राचे अभ्यासक्रम बदलण्याचे व त्या ठिकाणी जास्त कार्यक्षम अभ्यासक्रम ठेवावयाचे, केवळ एवढ्या परिवर्तनाचा हवा तसा लाभ मुळीच नाही कारण शिक्षणाच्या इतर विभागांवर पाश्चात्यांचा कमालीचा प्रभाव आहे. या अभ्यासक्रमात परिवर्तनामुळे इस्लामी संस्कृतीची सेवा होण्याचे स्वप्न पाहणे म्हणजेच कल्पनाविलासच होय. इस्लामच्या वास्तविकतेचा विचार केल्यास ही गोष्ट आपल्यासमोर आपोआप स्पष्ट होईल की, ऐहिक वा भौतिक शिक्षण आणि धर्मशास्त्राचे शिक्षण पृथक करुन शिकविल्यास काहीच साध्य होणार नाही. इस्लाम धर्म हा ख्रिस्ती धर्मासारखा मुळीच नाही की जो जागतिक आणि व्यावहारिक अथवा ऐहिक शिकवणी, धर्म वा उपासनाशास्त्रांच्या शिकवणी पृथक ठेवतो. इस्लाम धर्मात श्रद्धाशास्त्र आणि व्यवहार शास्त्र अथवा ऐहिक जीवनशास्त्र मुळीच पृथक नाही. इस्लाम धर्म म्हणजे केवळ काही उपासना, आराधना व कर्मकांड करण्याचे नाव मुळीच नसून ती एका यशस्वी जीवनव्यवस्थेची घटनाबद्ध पद्धत आहे. ऐहिक जीवन यशस्वीरीत्या जगण्यासाठी आणि जागतिक व्यवहार कुशलतेने हाताळण्यासाठी विद्यार्थ्यांना एका अशा प्रणालीचे व पद्धतीचे शिक्षण व प्रशिक्षण देणे आवश्यक आहे की, त्याचे ऐहिक आणि पारलौकिक जीवन यशस्वी व्हावे. या उद्दिष्टपूर्तीसाठी इस्लामी शिक्षण हे विद्यार्थ्यांच्या विचारसरणीत सुधारणा घडवून आणते. त्यांचे आचरण आणि नैतिकता,

जीवनपद्धती वगैरे एका विशिष्ट स्वरुपात घडविते. त्याचे अधिकार आणि कर्तव्य निश्चित करते. त्याच्या समाजजीवनाची एक विशेष व्यवस्था निश्चित करून देते. व्यक्तींचे वैचारिक आणि कार्यात्मक प्रशिक्षण हे समाजनिर्मिती व मानव संघटनाच्या संपूर्ण शाखा आणि क्षेत्रात मानवास प्रशिक्षित करते. हे नियमच इतर धर्माच्या नियमांपेक्षा विभिन्न असल्याने इस्लामी संस्कृती एक वेगळीच संस्कृतीचे स्वरुप धारण करते आणि याच कारणास्तव मुस्लिम जनसमूहाचे अस्तित्व अबाधित राहते. मग ही परिस्थितीच अशी असल्याकारणाने 'इस्लामी धर्मशास्त्र' हा पारिभाषिक शब्दच मुळात निरर्थक ठरतो कारण या परिस्थितीत जीवन आणि व्यवहाराचा धर्माशी कवडीमात्र संबंध नसतो. इस्लामी संस्कृतीसाठी असा धर्मपंडित व्यर्थ सिद्ध होतो ज्याला इस्लामच्या श्रद्धाशास्त्र आणि नियमांचा अभ्यास आहे, परंतु ही माहिती व अभ्यास घेऊन तो ज्ञान व कार्यक्षेत्रात पुढाकार घेऊ शकत नाही. तसेच जीवनाच्या सतत बदलत असणाऱ्या स्थिती व समस्यांत आपल्या ज्ञानाचा वापर करु शकत नाही. अर्थातच धार्मिक ज्ञान आणि नियमांच्या आधारे धर्मपंडिताने कार्यात्मक क्षेत्रात पुढाकार घेऊन ऐहिक जीवनाचे प्रश्न सोडविले पाहिजेत. कारण धर्मशास्त्रामध्येच जीवनाच्या संपूर्ण समस्यांचे निराकरण आहे. त्याचप्रमाणे इस्लामी संस्कृतीच्या हितास्तव असा वैज्ञानिक अथवा भौतिक ज्ञानाचा पंडितसुद्धा निरर्थक आणि अपात्र ठरतो ज्याची इस्लामच्या तत्त्वांवर श्रद्धा तर आहे, परंतु त्याची विचार पद्धती इस्लामेतर आहे, व्यावहारिक जीवनाच्या समस्यांबाबतीत इस्लामेतर विचारसरणीचा तो अवलंब करीत असून इस्लामेतर विचार पद्धतीनेच जीवनाचे प्रश्न सोडवितो. अर्थातच जीवनातील प्रत्येक समस्येचे निराकरण हे इस्लामी विचारसरणीच्या आधारावर होणे आवश्यक आहे. वास्तविक पाहता इस्लामी संस्कृतीच्या ऱ्हासाचे नेमके हेच कारण आहे की, एका दीर्घ काळापासून आपल्या समाजात याच दोन प्रकारचे विद्वान निर्माण होत आले असून ऐहिक ज्ञान आणि आध्यात्मिक ज्ञान या धर्मशास्त्राच्या दोन्ही शाखांचे परस्पर संबंध संपुष्टात आले आहेत. सध्याच्या परिस्थितीत आपणास जर असे वाटत असेल, की इस्लामी संस्कृतीचे परत नूतनीकरण व्हावे, तिचा पूर्णत: विकास व्हावा. दुसऱ्या इतर पोकळ संस्कृतींचे नेतृत्व स्वीकारून चालण्याऐवजी संपूर्ण विश्वाचे नेतृत्व करणारी संस्कृती अस्तित्वात यावी तर हे संपुष्टात आलेले संबंध परत जोडणे आवश्यक आहेत. अर्थात धर्मशास्त्राचा ऐहिक ज्ञान व आध्यात्मिक ज्ञानांचा विभक्त झालेला संबंध परत जोडण्यात यावा. मात्र हे संबंध जोडण्याची आपण अवलंबलेली पद्धत आणि तऱ्हा अगदीच विलक्षण वाटते जिथे धर्मशास्त्राच्या आध्यात्मिक अभ्यासक्रमाला शिक्षणरुपी शरीराच्या गळ्यातील ताईत अथवा कंबरपट्टा बनवावे. तर याची खरी पद्धत अशी आहे, की समस्त शिक्षण व प्रशिक्षण व्यवस्थेत धर्मशास्त्राचे आध्यात्मिक शास्त्र शिक्षणरूपी शरीरातील धमण्यांमध्ये रक्ताप्रमाणे वहावयास हवे. एवढेच नव्हे तर आध्यात्मिक शास्त्राचे शिक्षणच पूर्णत: शिक्षणरुपी शरीराचा आत्मा, मेंदू, श्रवण शक्ती आणि दृष्यशक्ती, भावना व विवेक आणि विचारशक्ती

असावी. पाश्चात्य विद्येचे संपूर्ण ज्ञान व तंत्र हे या शरीराचे आदेशपूर्ण करणारे हातपाय असावेत. अशा प्रकारे मुस्लिम तत्त्वज्ञ, मुस्लिम विचारवंत, मुस्लिम वैज्ञानिक, मुस्लिम अर्थतज्ञ व इतर सर्वच शाखेतील मुस्लिम तज्ञ निर्माण करणे शक्य होईल. हे तज्ञ जीवनाच्या सर्व समस्या इस्लामी दृष्टिकोनातून सोडवतील. वर्तमान संस्कृतीची विकसित् साधने व माध्यमांमार्फत इस्लामी संस्कृतीची सेवा साधतील. इस्लामी सिद्धान्त आणि विचारसरणी व जीवनतत्त्व आधुनिक पद्धतीने संपादित करतील. इथपावेतो की इस्लाम धर्मास ज्ञान व कार्याच्या प्रत्येक क्षेत्रात परत तेच मूळ स्थान प्राप्त होईल ज्याकरिता वस्तुत: तो या जगात अवतरित करण्यात आला आहे.

हीच ती मूळ कल्पना होय, जी मुस्लिमांच्या आधुनिक शिक्षण पद्धतीसाठी मौलिक बाब असावयास हवी. ज्या स्थानावर 'सर सय्यद अहमद' आपल्याला सोडून गेले होते, त्या स्थानांपासून जग खूप पुढे गेलेले आहे. आता जर थोडाही वेळ वाया घालविला आणि आपण त्याच स्थानावर राहिलो तर अनर्थ होईल. मुस्लिम समाजाचा विकास तर खूपच दूर, जीवंत राहणेसुद्धा कठीण होईल.

## दुसरे परिशिष्ट

## मुस्लिम शिक्षणातील सुधारणात्मक धोरण

आता मी या गोष्टीवर प्रकाश टाकू इच्छितो की, मी सादर केलेल्या शिक्षण प्रणालीस कार्यात्मक स्वरुप कसे द्यावे.

१) मुस्लिम विद्यापीठाच्या मर्यादितून फिरंगी संस्कृतीस समूळ नष्ट करावे. जर आपण आपल्या संस्कृतीचा आपल्याच हाताने गळा आवळू इच्छित नसाल तर आपले हे परमकर्तव्यच आहे, की आपल्या नवीन पिढीतील दिवसेंदिवस वाढत जाणारी फिरंगी संस्कृतीची विल्हेवाट तत्काळ लावण्यात यावी. ही प्रवृत्तीच मुळात समाजामध्ये गुलामगिरीची मानसिकता आणि न्यूनगंडाची (Inferiority Complex) पैदास आहे. मग जेव्हा या बाबींचे कार्यात्मक प्रकटीकरण हे पोषाख, संस्कृती, वर्तन, चालीरीती आणि सामान्यत: पूर्ण सामूहिक वातावरणात होते, तेव्हा ते आतील व बाहेरील दोन्ही बाजूस प्रभावित करते व तसेच राष्ट्रीय स्वाभिमानाची किंचितही भावना शिल्लक राहू देत नाही. अशा बिकट व घातक परिस्थितीत इस्लामी संस्कृती टिकणे हे मुळीच शक्य नाही. जगातील कोणतीच संस्कृती ही केवळ आपले तत्व आणि मौलिक कल्पनांच्या एकाकी मानसिक अस्तित्वातून जन्माला येत नसून त्याकरिता प्रत्यक्ष कार्यात्मक प्रयोगाची नितांत गरज असते व याच आधारावर तिचा विकास घडत असतो. जर कार्यात्मक प्रयोगच नाहिसा झाला तर कोणतीही संस्कृती आपोआपच नाश पावते आणि त्यासोबतच तिचे बौद्धिक अस्तित्वसुद्धा नष्ट होते. सर्वांत जास्त प्राधान्यपूर्ण सुधारणा हीच होय की, विद्यापीठामध्ये जीवंत असलेले इस्लामी वातावरण निर्माण करण्यात यावे. मुस्लिमांच्या नवीन पिढीस आपल्या सामाजिक आणि राष्ट्रीय संस्कृतीचा

अभिमान बाळगण्यास प्रेरित करणारे शिक्षण व प्रशिक्षण देण्यात यावे. या पिढीत आपल्या राष्ट्रीय व सामाजिक वैशिष्ट्यांविषयी नितांत आदरच नव्हे तर प्रेमाची भावना उत्पन्न करण्यात यावी. इस्लामी नीतीमत्ता आणि इस्लामी जीवनशैली जीवंत करण्यात यावी. या पिढीमध्ये एवढी पात्रता निर्माण करण्यात यावी की, तिने स्वत:हून ज्ञान आणि आपल्या प्रशिक्षित बुद्धीमत्तेच्या व पात्रतेच्या आधारे आपल्या राष्ट्रीय व सामाजिक संस्कृती व सभ्यतेस अत्युच्च ठिकाणी पोहोचवावे.

२) विद्यार्थ्यांमध्ये अथवा नवीन पिढीमध्ये इस्लामी प्रेरणा निर्माण करणे हे जास्त करून शिक्षकवर्गाच्या ज्ञान आणि कार्यात्मक जीवनशैलीवर अवलंबून आहे. जे शिक्षक स्वत: या पात्रता व प्रेरणांपासूनच वंचित नव्हे तर ज्यांची कथनी व करणीच याविरुद्ध आहे, अशा शिक्षकांच्या शैक्षणिक प्रभावाखालील विद्यार्थ्यांत इस्लामी स्पिरीट वा प्रेरणा निर्माण होणे शक्यच नाही. आपण केवळ इमारतीचा आराखडा (Plan) तयार करु शकता, परंतु या इमारतीची निर्मिती करणारे कारागीरसुद्धा आपणच आहोत असे समजण्याचे कारण नाही. हे कारागीर म्हणजे आपल्या विद्यापीठातील शिक्षकांचा स्टाफ आहे. इस्लामी स्वरुपाची इमारत बांधण्याची अपेक्षा कोण्या फिरंगी व पाश्चात्य प्रकारच्या कारागिरांकडून करणे म्हणजेच बाभळीचे बी पेरून आंबे मिळविण्याची अपेक्षा बाळगण्यासारखे होईल. केवळ धर्मशास्त्राचे मुल्ला-मौलवी स्वरुपाचे शिक्षक नियुक्त करणे अगदीच निरर्थक ठरेल. कारण इतर दुसरे विषय शिकविणारे शिक्षक हे इस्लामेतर विचारसरणीचे असतील. असले इस्लामेतर विचारसरणीचे शिक्षक जीवनाच्या व्यवहारांबाबत विद्यार्थ्यांच्या बुद्धी व कल्पना इस्लामी विचारकेंद्राच्या विरुद्ध दिशेस वळवितील. या गंभीर समस्येचे निराकरण धर्मशास्त्राच्या काही विषयांच्या शिक्षणाने होणारच नाही. तत्त्वज्ञान, विज्ञान, अर्थशास्त्र, विधीशास्त्र, इतिहास असो की इतर कोणताही विषय असो. आपल्या विद्यापीठात या विषयांतील शिक्षक केवळ आपल्या विषयांचेच तज्ञ व पारंगत असून चालणार नसून प्रत्येक विषयाचा शिक्षक हा पूर्णत: मुस्लिम असावा. विशिष्ट प्रसंगी यदाकदाचित एखादा विषय शिकविण्यासाठी मुस्लिमेतर तज्ञ शिक्षकाची गरज पडलीच तर काही हरकत नाही. मात्र सामान्य नियम तर असाच असावयास पाहिजे की, आपल्या विद्यापीठातील प्राध्यापक हा आपल्या विषयात तज्ञ तर असावाच, परंतु या सोबत तो विद्यापीठाचे मूळ हीत जोपासणारासुद्धा असावा. अर्थातच तो इस्लामी विचारसरणी असलेला आणि त्यावर आचरण करणारा असावा.

३) विद्यापीठात 'अरबी' भाषा अनिवार्य (Compulsory) असावी. कारण हीच आपल्या संस्कृतीची भाषा असून इस्लामच्या मूळ स्त्रोतापर्यंत पोहोचण्याचे हेच एकमेव साधन आहे. जोपर्यंत मुस्लिम समाजाचा सुशिक्षित वर्ग दिव्य कुरआन आणि प्रेषित जीवनप्रणालीपर्यंत प्रत्यक्षपणे पोहोचणार नाही, तोपर्यंत इस्लामचा मूळ आत्माच त्याला कळणार नाही. तसेच इस्लाम धर्माचे सत्यज्ञानही त्याला मिळणार नाही. शिवाय तो नेहमीसाठी इस्लाम

धर्मशास्त्राच्या अनुवादावरच निर्भर राहील. अशा प्रकारे त्यास सूर्याचा दिव्य प्रकाश प्रत्यक्षरीत्या न मिळता विभिन्न प्रकारच्या रंगीबेरंगी भिंगातूनच मिळेल. आज आपल्या समाजातील आधुनिक शिक्षण घेतलेल्या मंडळीस इस्लामच्या अगदी बाराखडीचीसुद्धा ओळख नाही. याचे मूळ कारण हेच आहे की, त्यांच्याकडे दिव्य कुरआन आणि प्रेषितांच्या जीवनप्रणालीची माहिती मिळविण्याचे वा अभ्यास करण्याचे कोणतेच साधन नाही. पुढील काळात जेव्हा भारताच्या विधानपरिषदेस कायदानिर्मितीचे वाढीव अधिकार प्राप्त होतील आणि 'सोशल रिफॉर्म' चे नवीन कायदे निर्माण होतील, तेव्हा इस्लामी ज्ञानापासून वंचित असलेले व इस्लामी ज्ञान नसलेले लोक मुस्लिमांचे प्रतिनिधित्व करीत असतील, तर आधुनिक कायदेनिर्मितीतून मुस्लिम समाजात 'सोशल रिफॉर्म' निर्माण होण्याऐवजी उलट 'सोशल डिफॉर्म' होऊन मुस्लिमांची सामूहिक व्यवस्था आपल्या मूळ नियमांपासून विभक्त होऊन पार विस्कळित होईल. म्हणून अरबी भाषा विषयास केवळ भाषा विषयापुरते मर्यादित न समजता ही विद्यापीठाच्या मूळ उद्दिष्टांशी संबंधित आहे आणि जी बाब मूळ उद्दिष्टांशी संबंधित (Fundamental) असते तिला विशेष महत्त्व देणे आवश्यक असते.

४) माध्यामिक शिक्षणामध्ये विद्यार्थ्यांना निम्नोल्लेखित विषयाची मूलभूत माहिती होणे आवश्यक आहे.

अ) श्रद्धाशास्त्र :- या विषयात श्रद्धा शास्त्राचे रटाळ वर्णण न येऊ देता श्रद्धाशास्त्राच्या आकलनासाठी अतिशय सोपी आणि सरळ भाषा वापरण्यात यावी. ही भाषा स्वाभाविक आणि मानवी बुद्धीस अपील करणारी असावी. विद्यार्थ्यांना हे पण माहीत होणे आवश्यक आहे की, इस्लाम धर्मावरील श्रद्धा म्हणजे या समस्त विश्वाचे मूलभूत सत्य असून या सत्याचा आपल्या जीवनाशी गाढ संबंध आहे.

आ) इस्लामी नीतीमत्ता :- या विषयात केवळ नैतिक कल्पना सादर न करता आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) त्यांचे अनुयायी-सोबती आणि त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या प्रेषितांच्या जीवनचरित्रातील अशा घटना एकत्रित करण्यात याव्या की ज्यातून विद्यार्थ्यांना हे ज्ञात व्हावे की मुस्लिमांचे वर्तन व चरित्र कशा स्वरुपाचे असावे आणि मुस्लिमांची जीवनशैली कशी असावी.

इ) इस्लामी विधीशास्त्र :- या विषयात मानवावर असलेले ईश्वराचे अधिकार आणि मानवाचे मानवावर असलेले अधिकार व वैयक्तिक आचरणाबाबतीत इस्लामी विधीचे मूलभूत आणि आवश्यक असलेले नियम शिकविण्यात यावेत. त्याचप्रमाणे आपल्या विधीशास्त्राच्या प्राचीन ग्रंथांत असलेले घटक यात नसावेत. उदाहरणार्थ, विहिरीत उंदीर पडल्यावर त्यातील पाणी पवित्र होण्यासाठी किती बादल्या पाणी उपसावे लागेल इ. बाबींव्यतिरिक्त उपासना आणि नियमांची वास्तविकता, त्यांचा मूळ आत्मा आणि त्यांची उद्दिष्टे विद्यार्थ्यांना

शिकविण्यात यावीत. त्यांना हे ज्ञात करणे आवश्यक आहे, की इस्लाम धर्माने आपल्या वैयक्तिक आणि सामूहिक जीवनाची कशी रुपरेखा आखलेली आहे आणि ही रूपरेखा व कार्यक्रम कशारीतीने एका चारित्र्यवान समाजाची निर्मिती करतो.

**ई) इस्लामी जीवन :-** हा विषय केवळ आदरणीय प्रेषित महुम्मद (स) आणि त्यांच्या अनुयायी-सोबत्यांच्या काळापर्यंतच मर्यादित असावा. यात शिक्षणाचा हेतु हा असावा की, विद्यार्थ्यांत आपल्या धर्म व राष्ट्रीयत्वाच्या मौलिकतेचे ज्ञान मिळावे. त्याचप्रमाणे त्यांच्या अंत:करणात इस्लामचा अभिमान जागृत व्हावा.

**उ) अरबी भाषाशास्त्र :-** अरबी भाषा विषयात अरबी साहित्याची जाण करून देणारे प्राथमिक स्वरुपाचे शिक्षण देण्यात यावे.

**ऊ) दिव्य कुरआन :-** दिव्य कुरआनचे न अड़खळता सुलभ वाचन आणि त्यातील साध्या आयतींचे आकलन विद्यार्थ्यांना व्हावे. तसेच काही सूरती त्यांना मुखपाठ व्हाव्यात.

५) महाविद्यालयीन शिक्षणात सर्वांसाठी एकाच स्वरुपाचे अभ्यासक्रम असावे. या अभ्यासक्रमाचे विषय खालीलप्रमाणे असावेत.

**अ) अरबी भाषाशास्त्र :-** कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षणात अरबी साहित्याचे मध्यम स्वरुपाचे शिक्षण असावे. बी.ए.मध्ये अर्थात वरिष्ठ महाविद्यालयात पोहोचल्यावर हा विषय दिव्य कुरआनच्या विषयात समाविष्ट करण्यात यावा.

**आ) दिव्य कुरआन :-** कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षणातच विद्यार्थी दिव्य कुरआनचा सार समजण्यासाठी तयार व पात्र व्हावेत. या प्रसंगी केवळ काही महत्त्वाच्या व मौलिक बाबींचे ज्ञान व्हावे. उदाहरणार्थ - दिव्य कुरआन हे नेहमीसाठी सुरक्षित असणे आणि ते ऐतिहासिकरीत्या प्रमाणसिद्ध असणे आणि ते ईश्वरी वाणी असणे. याच सोबत या बाबीचे पण विशेष ज्ञान व्हावे की, दिव्य कुरआनास जगातील सर्व धर्मांच्या मूळ ग्रंथाच्या तुलनेत निर्विवाद प्रभुत्व आहेच. त्याची अतुलनीय क्रांतिकारी शिकवण त्याचे विलक्षण प्रभाव हे केवळ अरबजणांवरच पडलेले नसून विश्वाच्या समस्त सैद्धांतिक विचारसरणी आणि जीवनविधीवर पडलेले आहेत. म्हणून दिव्य कुरआनचा वास्तविक सिद्धान्त (Thesis) हा दिव्य कुरआनच्याच प्रभावशाली भाषेत शिकविण्यात यावा. बी.ए.च्या अर्थात वरिष्ठ-महाविद्यालयीन शिक्षणात दिव्य कुरआनचे मौलिक शिक्षण देण्यात यावे. या शिक्षणाच्या माध्यमाने हे अपेक्षित आहे की, विद्यार्थ्यांना दिव्य कुरआनचा सार ज्ञात व्हावा. अडचणी भासल्यास शिक्षकांनी त्या दूर कराव्यात. अशा प्रकारे दोन वर्षांत अगदी सुलभतेने पूर्ण दिव्य कुरआनचे शिक्षण देता येईल.

**इ) इस्लामीशास्त्र शिक्षण :-** या विषयाच्या माध्यमाने विद्यार्थ्यांना इस्लामी व्यवस्थेचे पूर्णत: आकलन व अभ्यास होणे अपेक्षित आहे. इस्लामचा पाया ज्या मूळ संकल्पनांवर आधारित आहे, या संकल्पनांच्या आधारांवर विद्यार्थी आपली नीतीमत्ता आणि आचरण कशा पद्धतीने ठरवू शकतो, मग या समाजाच्या जीवनाची दिशा सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि

आंतरराष्ट्रीय संबंधात कोणत्या प्रकारच्या विधी व नियमांवर ठरवू शकतो, त्याच्या सामूहिक व्यवस्थेत व्यक्ती आणि समूहाच्या दरम्यान कशा रितीने व कशा पद्धतींनी अधिकार व कर्तव्यांची मांडणी करण्यात आलेली आहे, ईश्वराच्या आदेशांच्या मर्यादा कोणत्या असून ईश्वरी आदेशांचे महत्त्व व स्वरुप कशा प्रकारचे आहे, या आदेशमर्यादांच्या आत मुस्लिमांना किती प्रमाणात विचार व कार्यस्वातंत्र्य आहे व या मर्यादांचे उल्लंघन केल्यास इस्लामी-व्यवस्थेवर काय परिणाम होतील? या सर्व बाबी अतिशय वैशिष्ट्यपूर्ण शैलीत अभ्यासक्रमात सामील कराव्यात. तसेच हा अभ्यासक्रम चार वर्षांच्या कालावधीत योग्यतेनुसार प्रमाणबद्धरीतीने विभागण्यात यावा.

६) हा सामान्य अभ्यासक्रम संपल्यावर इस्लामीशास्त्राची विभिन्न विशेष विषयांत विभागणी करण्यात यावी. प्रत्येक विषयात प्रत्येक विशेष विषयानुसार त्यात इस्लामी शिकवणी सामील करण्यात यावी. पाश्चात्य विद्या व कौशल्य हे आपल्या ठिकाणी योग्य आणि लाभदायक असून इस्लमाचा त्यास मुळीच विरोध नाही. उलट माझे तर असे मत आहे की, इस्लाम धर्मास या विद्या आणि कौशल्यें खूप आवडतात. इस्लाम धर्मास या बाबींशी मुळीच वैर नाही. वैर हे केवळ पाश्चात्यकरणाशी आहे. कारण बऱ्याच विद्यांमध्ये पाश्चात्यजण आपल्या काही विशेष मूळ संकल्पना, मूळ विचारसरणी (Hypothesis), स्त्रोत-बिंदू (Starting points) आणि विशेष दृष्टिकोन राखतात. या बाबींची स्वत: कोणतीही वास्तविकता नसून या केवळ निराधार आणि बिनबुडाच्या असतात. तरीसुद्धा या निराधार संकल्पना हे पाश्चात्यजण ज्ञानवास्तविकतांमध्ये बळजबरीने खुपसण्याचा हास्यास्पद प्रयत्न करीत असतात आणि त्यांचे संपादन करून एका विशेष जीवनव्यवस्थेची निर्मिती करतात. खरे पाहता याच बाबींशी इस्लामचे वैर आहे. इस्लाम धर्मास स्वत:ची एक मूळ केंद्रीय संकल्पना आणि सिद्धान्त आहे. स्वत:चा एक दृष्टिकोन आहे. एक विचारस्त्रोत आणि स्वत:ची एक स्वतंत्र विचारसरणी आहे. या संपूर्ण बाबीं पाश्चात्य विचारसरणीच्या नेमक्या विरुद्ध आहेत. आता आपल्या लक्षात हे नक्कीच आले असेल की, इस्लामी दृष्टिकोनानुसार पाश्चात्य ज्ञान वाईट नसून त्यात बळजबरी खुपसलेल्या त्यांच्या बिनबुडाच्या संकल्पना नकोशा आहेत. तत्वज्ञान, विज्ञान, इतिहास, कायदा, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र आणि इतर विषय- विभागात आपण स्वत:हूनच विद्यार्थ्यांच्या बुद्धींमध्ये अथवा विचारांमध्ये पाश्चात्यांची विचारसरणी आणि मूळ संकल्पना ठसवितो. त्यांच्या (विद्यार्थ्यांचा) दृष्टिकोनाची दिशा पाश्चात्य दृष्टिकोनाशी समांतर करतो. त्यामुळे विद्यार्थ्यांची विचार करण्याची तऱ्हाच पाश्चात्य होते. विद्यार्थ्यांची आकलनशैली आणि बुद्धी ही पाश्चात्य प्रणालीची होते. विद्यार्थी पाश्चात्य शैलीनुसारच संशोधन करू लागतात. आपणासर्वांनाच याची चांगल्याप्रकारे कल्पना आलीच असेल की, इस्लामी धर्मशास्त्राचा एकुलता एक

विभाग या समस्यांचे निराकरण करु शकणार नाही. अर्थातच विद्यापीठातील अशा प्रकारचा अभ्यासक्रम शिकून आलेला विद्यार्थी 'मुस्लिम' कसा होईल? अशा वेळी इस्लामी धर्मशास्त्राचे शिक्षण की ज्यामध्ये एकाकी कल्पना असून ज्ञान वास्तविकता व जीवन समस्यांचा लवलेशही नाही ते काय करेल? हेच मार्गभ्रष्टतेचे मूळ स्त्रोत आहे. जर आपणास ही मार्गभ्रष्टता नष्ट करावयाची असेल तर तिच्या मूळ स्त्रोतापर्यंत जाऊन तिची प्रवाहदिशा योग्य दिशेस वळवावी लागेल. तसेच समस्त विद्याशाखांना दिव्य कुरआनने प्रदान केलेली दृष्टिकोनाची दिशा देण्यात यावी. ज्या वेळेस या शोधित (Discovered) साच्यात माहिती संकलित होईल आणि या दृष्टीनुसार विश्व व जीवनाच्या समस्या व अडचणी सोडविण्यात येतील, तेव्हाच आपले विद्यार्थीजण हे पूर्णत: मुस्लिम विद्यार्थी ठरतील आणि मगच आपण छातीठोकपणे सांगू शकाल की, 'आम्ही या विद्यार्थ्यांमध्ये 'इस्लामी स्पिरीट' निर्माण केला नसता एका विभागात इस्लामी शिक्षण तर दुसऱ्या सर्व विभागात इस्लामेतर शिक्षण ठेवल्यास त्याचा हाच परिणाम होईल, की विद्यापीठातून पदवी घेऊन निघालेले विद्यार्थीजण हे तत्वज्ञानामध्ये मुस्लिमेतर, विज्ञानात मुस्लिमेतर, कायदा व विधीशास्त्रात मुस्लिमेतर, राज्यशास्त्रात मुस्लिमेतर, इतिहासशास्त्रात मुस्लिमेतर असतील आणि त्यांचा इस्लाम धर्म हा केवळ श्रद्धा, पूजापाठ आणि काही मोजक्या कर्मकांडापर्यंतच मर्यादित होऊन बसेल.

७) 'बी.टी.एच' आणि 'एम.टी.एच' च्या परीक्षा बंद करून टाकाव्यात. यांची काहीही गरज नाही व यांचा कोणताच फायदा पण नाही. मात्र ज्या ठिकाणी इस्लामी धर्मशास्त्राच्या विशिष्ट विभागांचा प्रश्न समोर येतो, त्या ठिकाणी यांपैकी प्रत्येक विभागास या सारख्याच स्वरुपाच्या पाश्चात्य विषयविभागाच्या अंतिम अभ्यासक्रमात सामील करावे. उदाहरणार्थ : 'तत्त्वज्ञानात' 'इस्लामी तत्वज्ञान' आणि 'इस्लामी तत्वज्ञानाचा इतिहास' त्याचप्रमाणे 'तत्त्वज्ञानाच्या उत्थानामध्ये मुस्लिमांची भूमिका', इतिहासामध्ये 'इस्लामचा इतिहास ' व 'इस्लामी तत्त्वज्ञानाचा इतिहास', 'विधीशास्त्र' विषयात व्यवहाराशी संबंधित असलेले इस्लामी विधीशास्त्र', अर्थशास्त्रात 'इस्लामी अर्थशास्त्राचे नियम' आणि दररोज संबंध येणाऱ्या व्यवहाराशी संबंधित असलेले 'इस्लामीविधीचे नियम' यासारखे विषय सामील असावेत. तसेच 'राज्यशास्त्र' या विषयात 'इस्लामी राज्यशास्त्र आणि त्याच्या उत्थानाचा व उत्क्रांतीचा इतिहास तसेच जगाच्या राजकीय सिद्धान्ताच्या विकासात इस्लामची भूमिका वगैरे बाबीं समाविष्ट असाव्यात.

८) या अभ्यासक्रमानंतर पाश्चात्य विद्यापीठाप्रमाणेच उच्चदर्जाच्या संशोधनावर 'डॉक्टरेट'ची पदवी बहाल करण्यात यावी. केवळ मुस्लिमांनाच नव्हे तर अगदी जागतिक स्तरावर प्रत्येक मानवासाठी मार्गदर्शक सिद्ध होणारे आणि साकल्यपूर्ण विचार करुन बारकाईने संशोधन करणारे लोक या विभागात तयार व्हावेत.

## (तिसरे परिशिष्ट)

## मुस्लिम शिक्षणाचे प्रयोगात्मक धोरण

दुसऱ्या परिशिष्टामध्ये ज्या शिक्षण पद्धतीचा व धोरणाचा आराखडा मी सादर केला आहे, तो त्यास कार्यात्मक वा प्रयोगात्मक स्वरुप देणे वरवरुन अतिशय कठीण कार्य वाटते. परंतु मी खूप विचारांती या निर्णयावर पोहोचलो की, अपार कष्ट आणि श्रद्धापूर्वक कार्य केल्यास आणि पैशाचा योग्य वापर केल्यास हे अतिशय सोपे, सुलभ व सुटसुटीत कार्य आहे.

हे सत्य मुळीच विसरता कामा नये की, आपण एखाद्या कार्यपूर्तीच्या मार्गात ठेवलेले पाऊल हे आपल्या हव्या असलेल्या उद्दिष्टापर्यंत तत्काळ पोहोचू शकत नाही. कामाची सुरुवात करण्यासाठी संपूर्ण कार्य साधने उपलब्ध असण्याची गरज नसतेच आणि ती तत्काळ उपलब्ध असणे शक्यही नसते. सध्यातरी आपणास केवळ पायाभरणीच व्यवस्थितपणे करावयाची आहे. सध्याच्या पिढीमध्ये असे लोकही उपलब्ध आहेत की, जे मी सादर केलेल्या स्वरुपाच्या इमारतीच्या पायाभरणीचे कार्य व्यवस्थितरीत्या पार पाडू शकतात. याच उपलब्ध लोकांच्या शिक्षण व प्रशिक्षणातून असे विद्यार्थी निश्चितच तयार होतील की, जे या नियोजित इमारतीच्या भिंती उभ्या करतील. मग तिसऱ्या पिढीतील विद्यार्थी हे कार्य तडीस लावतील. अर्थातच हे नियोजित कार्य तीन पिढ्यांच्या लोकांच्या कष्टाचे फळ असेल. करीता आजच्या आजच अंतिम लक्ष्य मिळविण्याचा विचार करण्याची गरज नाही व शक्यही नाही. मात्र तिसऱ्या पिढीकडून हे कार्य पूर्ण होण्यासाठी आपणास मात्र पायाभरणीचे मूळ कार्य करणे अत्यंत आवश्यक आहे.

मी या सुधारणात्मक धोरणाचा आपणास सल्ला देत असतांना माझेच शेवटी हेदेखील कर्तव्य आहे, की या कार्यास पूर्ण करण्याची नेमकी पद्धत व त्याची माहिती मी खालीलप्रमाणे क्रमबद्धरीत्या देत आहे.

१) माध्यमिक शिक्षणासाठी इस्लामी श्रद्धाशास्त्र, इस्लामी नीतीमत्ताशास्त्र आणि इस्लामी विधीशास्त्राचा एक उत्कृष्ट अभ्यासक्रम याच काळात निझाम सरकारच्या शिक्षण विभागाने तयार केला आहे. काही ठिकाणी सुधारणा केल्यास ते खूप लाभदायक आणि उपयोगी सिद्ध होईल.

प्राचीन पद्धतीमुळे निकृष्ट ठरलेली 'अरबी भाषाशास्त्र' विषयाची शिक्षण पद्धतही आता मात्र बरीच सुधारलेली आहे. अर्थातच हा विषय सोप्या पद्धतीने शिकण्यासाठी व शिकविण्यासाठी इजिप्त, सीरिया आणि आपल्या भारततही या विषयाच्या आधुनिक शिक्षण पद्धतीवर व्यवस्थित कार्य झाले. यामुळे ही भाषा कमी वेळेत व कमी कष्टाने शिकणे सुलभ झाले. 'अरबी भाषाशास्त्र' विषयाच्या आधुनिक शिक्षण पद्धतीसाठी यातील तरबेज आणि तज्ञ लोकांची एक समिती स्थापन करण्यात येऊन त्यांच्या चर्चेतून एक असा अभ्यासक्रम तयार करण्यात यावा की यामध्ये कुरआनालाच अरबी शिक्षणाचे साधन बनवावे. या प्रकारच्या शिक्षणामुळे कुरआन शिकण्याकरिता वेगळी तयारी करण्याची गरज पडणार नाही आणि वेळही खूप वाचणार, तसेच विद्यार्थ्यांचा कुरआनशी सूसंबंध प्रस्थापित होईल.

इस्लामी इतिहासावर आधारित पुष्कळ छोटीछोटी पुस्तके उर्दू भाषेत लिहिली गेली आहेत. यांच्यापैकी काही निवडक आणि व्यवस्थित असलेली पुस्तकें प्राथमिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमात ठेवावीत.

उपरोल्लेखित दोन्ही विषयांकरिता एक तास वेळ पुरेसा होईल. तसेच 'इस्लामी इतिहास' या विषयासाठीसुद्धा इतिहासाच्या सामान्य अभ्यासक्रमात सामील करता येईल. अशा प्रकारे मला वाटते की, माध्यमिक शालेय शिक्षणाच्या वर्तमान व्यवस्थेत जास्त बदल वगैरे करण्याची गरज नाही. बदल हा केवळ शैक्षणिक अभ्यासक्रम, शिक्षण पद्धती आणि शैक्षणिक स्टाफ (शिक्षक वर्ग) मध्येच करावा लागेल. आतापर्यंत तुमच्या मनमस्तिश्कामध्ये धर्मशास्त्र शिक्षकाची जी प्रतिमा ठसलेली आहे ती काढून टाका. त्याऐवजी सद्यास्थितीतील मुले व मुलींच्या मानसिकतेची आणि विचारसरणीची चांगली जाण असलेले शिक्षक नियुक्त करावेत. या शिक्षकांच्या स्वाधीन हा आधुनिक अभ्यासक्रम करून असे अनुकूल वातावरण निर्माण करा की ज्यामध्ये अंकुरीत होऊन त्याचा खूप विकास होईल.

२) महाविद्यालयासाठी मी सादर केलेल्या पद्धतीचे तीन भाग आहेत, अ) अरबी भाषाशास्त्र ब) कुरआन आणि ड) इस्लामीशास्त्र. यांपैकी आपण अरबी भाषेस दुय्यम अनिवार्य भाषेचा दर्जा द्यावा. इतर भाषा शिकण्याची विद्यार्थ्यांची इच्छा असल्यास 'ट्यूटर' च्या मदतीने शिकता येतील. परंतु महाविद्यालयात शैक्षणिक माध्यमाची जी भाषा आहे, तिच्या खालोखाल केवळ 'अरबी' हीच भाषा अनिवार्य (Compulsory) असावी. अभ्यासक्रम उत्तम व व्यवस्थित असल्यास आणि शिक्षक वर्ग चांगला असल्यास कनिष्ठ महाविद्यालयातील दोनच वर्षांत विद्यार्थ्यांत एवढी पात्रता निश्‍चितच निर्माण करता येईल की, बी.ए. मध्ये प्रवेश घेतल्यावर कुरआनचे शिक्षण कुरआनच्याच भाषेत व शैलीत घेणे शक्य होईल.

'कुरआन' विषय शिकविण्यासाठी कुरआनवरील विश्लेश्नात्मक ग्रंथाची गरज नसून एका अशा प्राध्यापकाची गरज आहे की, ज्याने कुरआनचा गाढ़ा आणि सखोल अभ्यास केलेला असेल आणि सोबत आधुनिक शिक्षणशास्त्राचा पुरेपूर वापर करून शिकविण्याची त्याच्यात पात्रता असेल. आपल्या अधिव्याख्यानाच्या माध्यमाने कनिष्ठ महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये कुरआन समजण्याची व आकलनाची पात्रता प्राध्यापकात असावी. त्यानंतर वरिष्ठ महाविद्यालयात अर्थात बी.ए. मध्ये प्राध्यापक पूर्ण कुरआनचे शिक्षण अशा प्रकारे देईल की, कुरआनबरोबरच विद्यार्थ्यांमध्ये अरबी भाषाशास्त्रावर प्रभुत्व व्हावे तसेच त्यांना पूर्णपणे इस्लामचा आत्मा कळावा. 'इस्लामी धर्मशास्त्र' या विषयासाठी एक असे आधुनिक पुस्तक लिहिण्याची गरज व आवश्यकता आहे, की ज्यामुळे मी दुसऱ्या प्रकरणातील क्र. ५ च्या (क) मध्ये निर्देशित केलेले उद्दिष्ट पूर्ण व्हावे. काही काळापूर्वी याच हेतुपूर्तीस्तव मी उर्दू भाषेत

''इस्लामी तेहज़ीब और उसके उसूल व मबादी'' (अर्थात - इस्लामी संस्कृतीचे मूळ नियम) या शीर्षकाखाली पुस्तक लिहिण्यास सुरुवात केली असून याच पुस्तकाची सुरुवातीची तीन प्रकरणे 'तर्जुमानुल कुरआन' या मासिकात प्रकाशित झाली आहेतच. गरज पडल्यास मी या पुस्तकाची लवकरच पूर्तता करून विद्यापीठास समर्पित करेन.

या विषयात महाविद्यालयीन शिक्षणाच्या तत्कालीन व्यवस्थेत कोणताच बदल करण्याची गरज पडणार नाही. द्वितीय भाषा शिकविण्यासाठी लागणारा वेळ 'अरबी भाषा' विषयास देता येईल. 'कुरआन' आणि 'इस्लामी धर्मशास्त्र' या दोन्ही विषयांकरिता आळीपाळीने त्याच तासिका पुरेशा आहेत, ज्या तासिकांमध्ये तुम्ही प्रचलित 'धर्मशास्त्र' शिकविता.

३) एवढे मात्र नक्की की, मी द्वितीय भागातील क्र.६ मध्ये निर्देशित केलेल्या शिक्षण नियोजनास कार्यात्मक स्वरुप देणे थोडे कठीण कार्य आहे. हे कार्य सोपे आणि सुटसुटीत होण्यासाठी माझ्याकडे तीन योजनात्मक बाबी आहेत.

अ) याकरिता असे अधिव्याख्याते आणि प्राध्यापक नियुक्त करण्यात यावे, ज्यांच्यात आधुनिक ज्ञानाबरोबरच 'कुरआन' आणि 'प्रेषित प्रणाली' वर सखोल नजर असावी. सोबतच त्यांच्यात एवढी पात्रता देखील असावी की, त्यांना पाश्चात्य ज्ञानाच्या वास्तविकतांना त्यांच्या सिद्धान्त आणि मूळ उद्दिष्टांना पृथक करुन इस्लामी नियम व दृष्टिकोनानुसार संपादित करता यावे.

ब) इस्लामी कायद्याचा सिद्धान्त, कायद्याचे नियम व विश्लेषण सिद्धान्त, राज्यशास्त्र, नागरिकशास्त्र, अर्थशास्त्र व इतिहास वगैरेविषयी अरबी, उर्दू, जर्मन आणि फ्रेंच भाषेत जेवढे साहित्य उपलब्ध आहे, त्यांची छाणणी करुन योग्य तेवढे निवडून आणि गरज असेल तेथे सुधारणा करून उपयुक्त बनवावे आणि त्याच प्रणालीवर कार्य करावे. या योजनापूर्तीस्तव तज्ञांची एक विशेष समिती गठित करण्यात यावी.

क) उपरोक्त विषयांवर आधुनिक ग्रंथ संपादित करणाऱ्या तज्ञांची सेवा मिळवावी.

४) 'इस्लाम' धर्माचा संशोधनाचा विशेष विभाग सुरु करण्याची सध्या संधी नाही. काही वर्षांनंतर याची गरज भासेल. याकरिता एखादी तजवीज सादर करण्याची गरज नाही.

५) मी सादर केलेल्या तजवीजी अथवा कार्यक्रमांमध्ये बदल करण्याच्या जास्त संधी नाहीत. तरीसुद्धा वेगवेगळ्या विचारसरणीच्या तज्ञांशी चर्चा करून बहुपंथीय विद्यार्थ्यांना इस्लाम धर्माच्या सामायिक नियमांनुसार प्रशिक्षण देण्यात यावे.

६) माननीय सर मुहम्मद याकूब साहेबांच्या या विचाराशी मी पूर्णपणे सहमत आहे की, वेळोवेळी विद्वानांना आमंत्रित करून विविध विषय आणि समस्यांवर व्याख्याने ठेवावीत. मला तर वाटते की, अलीगढ विद्यापीठ हे केवळ भारताचेच नव्हे तर संपूर्ण इस्लामी जगताचे

ज्ञानकेंद्र व्हावे. तुम्ही फक्त भारतातीलच नव्हे तर इजिप्त, सीरिया, पर्शिया तुर्की आणि यूरोपच्या मुस्लिम शास्त्रींनासुद्धा आमंत्रित करावे की, जेणेकरून त्यांनी येथे येऊन आपले विचार, अनुभव आणि संशोधनाचे परिणाम वर्णन करून येथील विद्यार्थ्यांमध्ये विचारसरणी आणि जीवनात्मा निर्माण करावा. अशा स्वरुपांच्या भाषणांचा पुरेपूर मोबदला देण्यात यावा, जेणेकरून या कामासाठी खूप वेळ देऊन आणि सखोल विचार करून ही भाषणे वा व्याख्याने तयार व्हावीत. तसेच या व्याख्यानांच्या लिखित प्रती केवळ विद्यार्थ्यांपुरत्याच मर्यादित नसाव्यात. उलट सुशिक्षित सामान्यजणांनासुद्धा लाभ मिळावा.

७) इस्लामी शिक्षणासाठी कोणतीही एकच भाषा विशेषरीत्या वापरणे योग्य होणार नाही. कारण उर्दू, अरबी आणि इंग्रजी या तिन्हीं भाषांपैकी कोणत्याही एकट्याच भाषेत सध्यातरी अभ्यासक्रमासाठी परीपूर्ण अभ्यासक्रम उपलब्ध नाही. ज्या भाषेत जे काही उपयुक्त उपलब्ध असेल, त्यास त्याच भाषेत अवगत करावयास पाहिजे. इस्लामी धर्मशास्त्राचे सर्व शिक्षक एवढे पात्र असावयांस हवे, की त्यांना एकाच वेळी अरबी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांवर प्रभुत्व असावे. अर्थातच कोणताही शिक्षक एकच भाषा अवगत असताना सच्चा शिक्षक होऊ शकणार नाही.

मी माझ्या दीर्घ होत चाललेल्या भाषणाबद्दल दिलगिरी व्यक्त करतो. परंतु हा मुद्दा समजावून सांगण्यासाठी या वर्णनाची गरज आहेच. कारण मी अगदीच अशा एका नवीन शिक्षणमार्गाकडे अंगुलीनिर्देश करीत आहे की, ज्याचा संशोधनात्मक आणि काटेकोर अभ्यास करण्यासाठी मला कित्येक वर्षे खर्च करावी लागली. मी या निर्णयावर पोहोचलो की, जोपर्यंत मी सांगितलेल्या प्रणालीवर शिक्षण दिले जाणार नाही तोपर्यंत मुस्लिमांचे राष्ट्रीय अस्तित्व आणि संस्कृती अबाधित राहूच शकत नाही. याच शिक्षण प्रणालीद्वारे त्यांच्यात शैक्षणिक क्रांती घडवून आणता येणे शक्य आहे. मला या गोष्टीची चांगली जाण आहे, की मी केलेल्या शैक्षणिक नियोजनास कार्यात्मक स्वरुप देण्यासाठी आवश्यक असलेली तज्ञ मंडळी सध्या येथेच अर्थात अलीगढ विद्यापीठातच आहे. या स्वप्नपूर्तीकरिता बाहेर कुठेच जाण्याची गरज नाही. त्याचप्रमाणे अलीगढमध्ये अशा लोकांचीसुद्धा कमतरता नाही की, ते या शैक्षणिक नियोजनास एका वेड्याचे स्वप्न समजतात. हे खरे आहे की, हे एक वेड आहे. परंतु हे ध्येयवेड आहे. मागील क्रांतिकारांनासुद्धा लोकांनी वेड़ेच म्हटले आहे. परंतु लवकरच सत्यपरिस्थिती समोर आली. तुम्ही हे विसरता मुळीच कामा नये, की आज मी भविष्यात डोकावून जे काही पाहतो आहे की या अंधाऱ्या रात्रीनंतर निश्चितच सूर्योदय होईल. म्हणून या कार्याची सुरुवात आजच व्हावी. तुम्ही हेदेखील लक्षात असू द्या की, एक भयानक वादळ आपल्याकडे मोठ्या जोमाने येत आहे. अत्ताच याकरिता हे कार्य जर केले नाही तर मात्र उद्याचा दिवस घोर आणि अक्षम्य पश्चात्तापाचा असेल. सर्वकाही संपून जाईल.

# प्रकरण चौथे

## पदवीदान समारंभाप्रसंगीचे भाषण

(मागे एकदा मला इस्लामी महाविद्यालयाच्या पदवीदान समारंभात व्याख्यान देण्याकरिता आमंत्रित करण्यात आले होते. त्या प्रसंगी झालेल्या व्याख्यानाचा सामान्यांना लाभ होण्यासाठी येथे लेखी स्वरुपात मी सादर करीत आहे. या ठिकाणी हे लिहिणे आवश्यक आहे की, व्याख्यानामध्ये मी जेवढ्या स्पष्टोक्तींचा वापर केला आणि परखडपणे आपले विचार मांडलेत, तेवढ्याच संयमाने आणि शांतपणाने प्रेक्षकांनी माझे व्याख्यान ऐकून घेतले. बऱ्याचजणांनी उदारमताने सत्याचा स्वीकार केला. ह्या महाविद्यालयाचे प्रिंसिपॉल हे एक असे गृहस्थ होते जे आजच्या विकासवादी आणि पुरोगामी विचारसरणीचे समजले जात होते. ते महाशय जुन्या वा प्राचीनवादी विचारसरणीच्या कोणत्याही विचारवंतास उघड आवाहन देत असत. अर्थातच जुन्या विचारसरणीशी त्यांचे हाड़वैर होते. हे सर्व असूनही सनातनींच्या कोणत्याही प्रतिकूल विचारांना मोठ्या औदार्याने आणि शांतपणे ऐकून घेण्याचे कमालीचे धाडस त्यांच्यात होते.

त्यांच्या उपस्थितीत दिलेले व्याख्यान मी येथे लेखी स्वरुपात वाचकांना सादर करीत आहे.

आपला

**सय्यद मौदूदी)**

**प्रिय विद्यार्थीजणांनो !**

तुम्ही आपल्या आयुष्याचे अत्यंत महत्त्वाचे असंख्य क्षण समर्पित करून ज्ञान मिळविले आहे. आज आपणास त्यांची फळे 'पदवी' च्या स्वरुपात मिळत आहेत. तुम्हीसुद्धा याच प्रसंगाची अत्यंत आतुरतेने वाट पाहत होता. अर्थातच हा प्रसंग आपल्या सर्वांकरिता अत्यंत आनंदाचा क्षण आहे. या आनंद सोहळ्याप्रसंगी मला आपणासर्वांच्या भावनांची चांगली जाणीव आहे. या शुभमुहूर्तावर आपल्या भावना दुखविण्याचे मलासुद्धा खूप दु:ख होते. ही वेळच अशी आहे की तुमच्या भावना सांभाळण्याच्या प्रयत्नात मी आपल्यासमोर 'सत्य' मांडू शकणार नाही. हे सत्य आपल्यासमोर आत्ताच मांडणे हेही अत्यंत आवश्यक आहे. कारण आपल्या जीवनाच्या प्रवासाचा एक टप्पा संपून दुसऱ्या टप्प्यात आपणास पाऊल ठेवावयाचे आहे. तुमच्या जीवनात भविष्यात खूप खडतर मार्ग येणार आहे. भविष्यात येणाऱ्या संकटांना सामोरे जाणेच तुमच्या नशिबी आलेले आहे. म्हणून केवळ भावना जपण्याचा विचार करुन हे 'कटूसत्य' लपविता येणार नाही.

खरे पाहता आपल्या शिक्षणाचे हे मूळ स्त्रोत अथवा शिक्षण जननी आणि केवळ इथलीच नव्हे तर अशा पद्धतीच्या कुठल्याही शिक्षण स्त्रोतास शिक्षणाची खरी पद्धत मान्यच करु शकत नाही. हे विद्यालय अथवा ज्ञानगृह नसून हा एक भयानक कत्तलखाना आहे. येथे तुम्हाला शिक्षण देण्यात आलेले नसून तुम्हास वधशीलेवर आणून तुमची अक्षरश: कत्तल करण्यात आली आहे. तुमच्या हातात आलेली पदवी ही मुळात पदवी नसून ते मृत्यूचे प्रमाणपत्र (Death Certificate) आहे. हे तुमचे नशीबच म्हणावे लागेल की, एका नियोजनबद्ध कत्तलखान्यातून तुम्ही आपला प्राण कसाबसा वाचवून बाहेर आलात. या मृत्यू प्रमाणपत्राविषयी शुभकामना देण्यासाठी मी येथे आलेलो नाही, तर... माझे येथे येण्याचे एकच कारण आहे, ते म्हणजे मला तुमच्याविषयी अत्यंत आपलेपणा व सहानुभूती आहे. आणखीन सांगायचे म्हटले तर माझे उदाहरण हे एका अशा माणसाचे देता येईल ज्याच्या सर्व बांधवांना निर्दयीपणे ठार करण्यात आले आणि या सामूहिक कत्तलीनंतर मृतांच्या या ढिगाऱ्यामध्ये तो भटकत आहे, तो एवढेच पाहतो आहे की, चुकून एखाद्या ठिकाणी एखादा माणूस शेवटच्या घटका मोजत असेल तर आपण कदाचित त्याचे जीवन वाचविण्यासाठी काहीतरी करावे.

तुम्हाला विश्वास ठेवावाच लागेल! यात कोणत्याच प्रकारची अतिशयोक्ती नाही. पत्रकारितेच्या भाषेत सांगायचे असेल तर मी कोणतीच 'सनसनी' निर्माण करण्याचा प्रयत्नही करीत नाही. केवळ सत्य परिस्थिती किती गंभीर आणि भयानक आहे, एवढेच मला निदर्शनास आणायचे आहे. खरोखरच सध्याच्या या शिक्षण धोरणाविषयी माझी हीच भूमिका आहे. तुम्हाला माहिती पाहिजेच असेल की, मी या निर्णायक आणि टोकाच्या भूमिकेवर का पोहोचलो? तर यात मुळीच आश्चर्य नाही. याचे कारण माझ्या तोंडून ऐकल्यावर तुम्ही निश्चितच माझ्या भूमिकेशी शंभर टक्के सहमत व्हाल!

तुम्हाला हे चांगलेच ठाऊक आहे की, जर एखादे रोपटे त्याच्या मूळ ठिकाणावरून उपटून एका अशा ठिकाणी वा जागेवर लावण्यात आले, जेथे त्याच्या वाढीकरिता अनुकूल वातावरण नसेल. तेथील माती, पाणी पवन आणि ऋतुमान त्यास प्रतिकूल असेल, तर ते रोपटे कधीच विकास करु शकणार नाही. ही गोष्ट वेगळी की, त्याच्या वाढ आणि विकासासाठी कृत्रिमरीत्या वातावरणनिर्मितीचे प्रयत्न करण्यात येईल. परंतु ही बाब मुळीच नाकारता येणार नाही की, प्रयोगशाळेतील कृत्रिम वातावरण प्रत्येक रोपट्यास जीवनभर पुरणार नाही. या गंभीर आणि असामान्य परिस्थितीकडे विचारपूर्वक पाहिल्यास ही बाब निश्चितच लक्षात येईल की, कोणत्याही रोपट्यास त्याच्या मूळ ठिकाणावरून उपटून प्रतिकूल वातावरणात नेऊन लावणे म्हणजेच त्या रोपट्यास ठार करणे होईल.

बरे! आता त्या दुर्दैवी रोपट्याचीही दुर्गती पाहा! हे रोपटे आपल्या मूळ ठिकाणावरून उपटले गेले नाही, जमीन तीच, तेच वातावरण, तेच ऋतुमान आणि पाणीसुद्धा तेच. याच वातावरणात या रोपट्याने जन्म घेतला. परंतु विज्ञान प्रयोगाद्वारे त्याच्यात असे काही बदल करण्यात आले की, बिचारे हे रोपटे आपल्याच मायभूमीत परके आणि पोरके झाले. आपलेच मूळ वातावरण त्यास प्रतिकूल भासू लागले. त्याचा जीव कासावीस व्हायला लागला. आपल्याच मायभूमीत आपली मुळे रुजवणे त्यास अवघड होऊन बसले. अर्थातच तो पाणी व क्षाराच्या रुपातील अन्नपाणी वगैरेपासून वंचित झाला. या वैज्ञानिक प्रयोगातून झालेल्या परिवर्तनामुळे त्याला असे स्वाभाविकच वाटू लागले, की आपण इथले नसून कोण्या इतर ठिकाणच्या मातीतून जन्मलो व आपणास बळजबरीने या परक्या आणि प्रतिकूल जमिनीत लावण्यात आले. आता मात्र त्याचे जगणे अतिशय कठीण होऊन बसले आणि जगण्याकरिता त्याला अनुकूल असलेले वातावरण आणि इतर आवश्यक बाबी कृत्रिमरीत्या तयार करण्याची नितांत आवश्यकता भासू लागली. नसता ते जागीच करपून नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. जगण्याकरिता प्रयोगशाळेचे खडतर जीवन त्याच्या नशीबी आले.

वरील दोन्ही उदाहरणांपैकी पहिले उदाहरण हे थोड्या कमी दर्जाचा अन्याय असून दुसरे उदाहरण हे अत्यंत भयानक स्वरुपाचा अन्याय आहे. कारण आपल्याच मायभूमीत जीव गुदमरुन जाणे, अन्न-पाण्यावाचून तडफडणे आणि कसाबसा श्वास घेण्यासाठी व जगण्याचा प्रयत्न करण्यासाठी त्यास कृत्रिम वातावरणाची गरज पडणे हा किती घोर अन्याय आहे. हे तर झालेच! शिवाय हा अन्यायप्रकार केवळ एकाच रोपट्यापुरता नाही. या भूमीवरील लक्षावधी आणि कोट्यवधी रोपट्यांना या अन्यायास बळी पाडण्यात येत आहे. शिवाय या असंख्य रोपट्यांना कृत्रिम वातावरण व कृत्रिम श्वास पुरविणेसुद्धा शक्य नाही; म्हणुन जीवन आणि मृत्यूच्या मध्येच तडफडणाऱ्या या रोपट्यांना जीवे मारलेलेच बरे!

विद्यार्थी मित्रांनो! वस्तुस्थितीला मी अतिशय जवळून पाहिले आणि याच निष्कर्षावर पोहोचलो, की या शिक्षण केंद्रातील ही अन्यायग्रस्त रोपटी मुळात तुम्हीच आहात. तुमच्यावर नेमका असाच निर्घृण अत्याचार करण्यात येत आहे. तुमचा जन्म भारत देशाच्या या भूमीत मुस्लिम समाजात झाला आहे. याच भारतभूमीत आणि येथीलच सांस्कृतिक वातावरणात तुम्ही डोळे उघडून पहिला श्वास घेतला आहे. तुम्हास जर आपली वृद्धी आणि प्रगती करून घ्यायची असेल तर याच मातृभूमीत आपली मुळे भक्कमपणे रोवावी लागतील. याच वातावरणातून प्राणवायू घ्यावा लागेल. येथूनच शक्ती आणि ऊर्जा अवगत करावी लागेल. याशिवाय इतर कोणताच पर्याय नाही. या वातावरणाशी जेवढी जवळीकता आणि आपुलकी

निर्माण कराल, तेवढी जास्त ऊर्जा आणि बळ तुमच्यात येईल. तुम्हाला फुले लागतील, फळे लागतील आणि या वृंदावनात टवटवीत बहर येईल. परंतु वस्तुस्थिती अगदी विचित्र आणि विलक्षण आहे. परिस्थिती नेमकी उलट आहे. कारण या ठिकाणी तुम्हास देण्यात येणाऱ्या शिक्षण व प्रशिक्षणामुळे ज्या भावना आणि विचार तुमच्या बुद्धीपटलावर मोर्तब होत आहेत, ज्या सवयी आणि आचरणपद्धती तुमच्यात निर्माण होत आहेत, जे गुणधर्म आणि नीतीमत्ता तुमच्या स्वभावात निर्माण होत आहेत, त्याचप्रमाणे तुमची जीवनप्रणाली ज्या साच्यात ढाळण्यात येत आहे, या सर्व बाबी मिळून या मायभूमीशी, या वातावरणाशी आणि ऋतुमानाशी सुसंगती निर्माण होऊ देतात काय? तुमची भाषा, तुम्ही वापरत असलेले पोषाख, तुम्ही स्वीकारलेली आचरणपद्धती, या शिक्षणातून मिळालेले विचार आणि सिद्धान्त, या सर्व बाबींचा तुमच्या इतर कोट्यवधी बांधवांशी शेवटी संबंधच काय आहे? शेवटी याच कोट्यवधी बांधवांच्या सान्निध्यात तुमचे जगणे आणि मरणे आहे. तुमची प्रत्येक बाब त्यांच्याच संस्कृतीशी निगडीत आहे, हे विसरुन कसे चालेल? या शिक्षणातून मिळालेले तुमचे हे विशिष्ट आणि विचित्र व्यक्तिमत्व या कोट्यवधी बांधवांच्या समाजात किती परके आणि विसंगत आहे. कदाचित या परकेपणाची आणि विसंगतीची किंचितसुद्धा जाणीव तुमच्यात असती तर किती चांगले झाले असते. परंतु दु:खाची बाब ही की ती जाणीवसुद्धा तुमच्या अंत:करणातून अतिशय निर्घृणपणे नष्ट करण्यात आली.

किमान एवढे तर तुम्हास समजत असेल की, कच्चा माल (Raw material) हा उद्योग व निर्मितीकरिता वापरण्यात येतो जेणेकरून जीवन सुलभ करण्यासाठी त्यांचा वापर व्हावा. परंतु जी वस्तु मुळात अशीच तयार केली गेली असेल की तिचा जीवनात काही उपयोग वा वापरच होत नसेल, तर ती निर्मितवस्तु वाया तर गेलीच, शिवाय तिच्यावर लावण्यात आलेले कौशल्य व कष्टसुद्धा वाया गेले. वस्त्रनिर्मितीवर विणकाराचे सर्व कौशल्ये यासाठीच खर्ची होतात की, हे वस्त्र सुरेखपणे तयार व्हावे. पोषाखनिर्मितीवर शिंपी आपले सर्व कौशल्ये एवढ्यासाठीच पणाला लावतो की, हा पोषाख शरीरावर व्यवस्थित यावा. परंतु पोषाख जर शरीरावर व्यवस्थित बसलाच नाही, तर कपडाही वाया जाणार आणि शिंप्याचे कौशल्यही वाया जाणार. अगदी नेमकी हीच परिस्थिती शिक्षणाच्या बाबतीत आहे. शिक्षणाचा उद्देशच नेमका हा आहे की, समाजात ज्या लोकांनी आत्ताच जन्म घेतला आणि ज्यांची शक्ती (Potentialities) अद्याप कच्च्या मालाच्या (Raw Material) स्वरुपात आहे, त्यांच्यातील याच बाबींवर आपले संपूर्ण कौशल्य वापरुन, त्यांना सजवून व टापटीप आणि नीटनेटके करुन या लायकीत आणावे की, ज्या समाजात त्यांनी डोळे उघडले, त्या समाजाशी या नवीन

पिढीची बांधिलकी निर्माण व्हावी आणि त्या समाजाच्या सर्व जबाबदाऱ्या यशस्वीपणे पेलण्याचे बळ निर्माण व्हावे. अर्थातच हीच नवीन पिढी समाजाच्या प्रगतीचे व यशस्वीतेचे माध्यम असावे आणि योग्य मार्गदर्शनाची यशस्वी मार्गदर्शक हीच पिढी असावी. परंतु जी शिक्षणपद्धती तुम्हाला आपल्याच मायभूमीत परके ठरविते, आपल्याच समाजाशी असलेले रक्ताचे नाते तोडून टाकते, आई-वडिलांचे ममत्व आणि सर्वधर्मीय जनतेप्रती आवश्यक असणारा बंधुभाव नष्ट करते, तर असे म्हणणेच योग्य ठरेल, की हे शिक्षण समाजाचे स्तंभ तयार करीत नसून समाजाची इमारतच नष्ट करते. येथे विद्यार्थी तयार होण्याऐवजी जीवनच वाया जाते. कारण विद्यार्थी घडविण्याची पद्धत चुकीची आणि शिक्षकही वाट चुकलेले. बाबाही गेलेत आणि दशम्याही गेल्यात प्रत्येक समाज व राष्ट्राची मुले मुळात समाज व राष्ट्राच्या भविष्याचे केंद्रबिंदू असतात. हे केंद्रबिंदू निसर्गातर्फे आपणास तयार नसलेल्या स्वरुपात मिळत असते. तसेच राष्ट्र आणि समाजास हे अख्त्यार वा अधिकार देण्यात येते की, त्याने स्वत: आपल्या हाताने आपले भविष्य घडवावे. अर्थात या अमूर्त स्वरुपास उत्कृष्ट स्वरुप द्यावे. परंतु आपण एवढे दुर्दैवी आणि दळभद्री आहोत की, आपण आपले भविष्य स्वत: लिहिण्याऐवजी दुसऱ्यांच्या हवाली करीत आहोत. तर मग ज्यांच्या स्वाधीन आपणच आपले भविष्य केले तर ते आपल्या मृत्यूचे प्रमाणच लिहिणार नाही काय?

आपण शिवून घेतलेला पोषाख जर आपल्या शरीरावर नीटनेटका बसत नसेल तर आपण विवश होऊन कवड़ीमोल भावात तो पोषाख विकून टाकतो. नेमकी हीच परिस्थिती या शिक्षण व्यवस्थेची झाली आहे. असेच आणि याच निकामी आणि निरर्थक पोषाखासारखेच विद्यार्थी येथे तयार होत आहेत. ज्या समाजाने हे विद्यार्थी निर्माण केले आहेत, त्या समाजात जेव्हा हे विद्यार्थी परत येतात, तेव्हा हे विद्यार्थीसुद्धा स्वत:हून असा विचार करतात की, या समाजाचे वा राष्ट्राचे वातावरण आपल्याला अनुकूल नाही. येथील कृती आणि संस्कृतीशी आपण जमवून घेऊ शकत नाही. तसेच हा समाज अथवा राष्ट्रसुद्धा असाच विचार करतो की, आपण यांच्यात आणि हे आपल्यात समरस होऊ शकत नाही. परिणामी हा समाज अथवा राष्ट्र या नवीन कूचकामी पिढीस कूचकामी व निरर्थक पोषाखाप्रमाणेच लिलावाकरिता बाजाराची वाट दाखवितो. तसेच या नवीन पिढीलासुद्धा हेच वाटू लागते की, आपला उपयोग आणि ऐपत व लायकीसुद्धा एवढीच आहे की, कवडीमोल भावात आपणास विकण्यात येत आहे. आता आपणच विचार करा की, किती दुर्दैव आहे या राष्ट्राचे ज्याची इतकी मौल्यवान मानवशक्ती असलेली नवीन पिढी कवडीमोल भावात इतरांना विकून कधीही न भरून निघणारे नुकसान ओढ़ावून आपण घेत आहोत. अर्थातच आपण आपली मौल्यवान मानवशक्ती इतरांना

देऊन मोबदल्यात अन्न-धान्य, चप्पल-जोड़े आणि कपड़ालत्ताच घेतो. ईश्वराने आपल्याला जी मानवशक्ती (Man Power) आणि बौद्धिक शक्ती (Brain Power) आपल्याकरिताच प्रदान केलेली आहे, ते इतरांच्या कामी येत आहे. मजेशीर बाब तर अशी आहे की या नुकसानकारक शिक्षणकृतीलाच आपण मोठे यश समजत आहोत.

बऱ्याच वेळा मला अशा काही विद्यार्थ्यांना भेटण्याचा योग येतो की, ज्यांचे उच्च शिक्षण चालू आहे किंवा आताच ते पदवीधर झाले आहेत. तेव्हा प्रथमत: मी ही बाब शोधण्याचा प्रयत्न करतो की, या उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनी आपल्या जीवनाचा हेतू निश्चित केला की नाही. परंतु काहीजणांचा अपवाद वगळता हजारो विद्यार्थ्यांना पाहून निराशाच माझ्या झोळीत पडते. कारण त्यांच्या जगण्याला काही उद्देशच नसतो, काही अर्थच नसतो. त्यांच्यात एवढी जाणीवसुद्धा नसते की, 'मानव' म्हणून जन्माला आल्यावर आपल्या जगण्याचा काही उद्देश आहे, आपल्या जगण्याला काही अर्थ आहे, आपल्या जीवनाचे काही लक्ष्य (Goal) आहे. उच्च शिक्षितांची, पदवीधरांची ही अवस्था पाहून माझे मन खिन्न होते, आत्मा तळतळतोय, डोके चक्रावून जाते. मला दु:ख तर होतेच, परंतु आश्चर्यसुद्धा वाटते की, या विचित्र आणि विलक्षण शिक्षण पद्धतीस कोणत्या नावाने संबोधित करावे. ह्या शिक्षण व्यवस्थेमागे पंधरा वर्षांपर्यंत किंवा वीस वर्षांपर्यंत सलग कष्ट करून व सर्व कौशल्ये पणाला लावूनसुद्धा विद्यार्थी हे देखील शिकू शकले नाही की मानवाचा जगण्याचा हेतू, अर्थ आणि लक्ष्य काय आहे. एवढेच काय, तर याच शिक्षण व्यवस्थेचा हा प्रताप आहे की, विद्यार्थ्यांना स्वत:च्या जीवनाचा हेतुच समजू नये, जगण्याचा अर्थच कळू नये आणि जीवनाचे लक्ष्य गाठण्याचा ध्यानीमनी विचारसुद्धा येऊ नये. मग आता आपणच विचार करा की ही शिक्षण व्यवस्था मानवाची निर्मिती करते की कत्तल करते? कोणताच उद्देश, अर्थ आणि लक्ष्य नसलेले जीवन तर प्राणी जगतात. जर मानवसुद्धा केवळ खाऊन पिऊन ऐश करण्यापुरताच आणि सर्व भोग भोगण्यापुरताच जगण्याचा उद्देश समजत असेल तर हा मानवसुद्धा बिनशेपटीचा प्राणीच होय.

माझ्या कठोर वाणीचा उद्देश हा मुळीच नाही की, मी तुमची निंदानालस्ती करून तुम्हास दु:ख द्यावे. मी याबाबतीत तुम्हास मुळीच दोषी ठरवित नाही. तुमचा दोषही नाही. उलट तुम्ही निर्दोष, अत्याचारपीड़ित आणि भयंकर अन्यायास बळी पड़लेले पामर आणि निरागस जीव आहात. हे सर्वकाही मी तुमच्या भल्याकरिताच कळकळून बोलत आहे. कारण हे दुर्दैव मला पाहवत नाही. मला वाटते की सध्या आपण जीवनाच्या ज्या कार्यक्षेत्रात आणि कृतीक्षेत्रात पाऊल ठेवण्यासाठी जात आहात, तेव्हा आपण आत्मपरीक्षण अवश्य करावे, की या स्तरावर तुम्ही कोणत्या स्थानावर उभे आहात, तुमची लायकी व पात्रता काय आहे.

आपण हे विसरता कामा नये, की आपण इस्लामी जनसमूहाचे सदस्य आहात. हा इस्लामी जनसमुदाय म्हणजे वंशवादावर आधारित राष्ट्र नव्हे की, जो या वंशात जन्म घेईल तोच या राष्ट्राचा सदस्य होईल, अर्थात वंशात जन्म घेतल्याकारणामुळे आपोआपच मुस्लिम ठरेल, असे मुळीच नाही! असेसुद्धा नाही, की इस्लामी जनसमुदाय म्हणजे एखाद्या अशा सांस्कृतिक समूहाचे (Cultural Group) चे नाव असेल की ज्याच्याशी केवळ सामाजिक संबंध प्रस्थापनेमुळे स्वत:स मुस्लिम जनसमुदायाचे सदस्य किंवा मुस्लिम म्हणता येईल. वास्तविक पाहता 'इस्लाम' हे एका अशा विशिष्ट विचार व्यवस्थेचे (IDEOLOGY) नाव आहे जिच्या मजबूत आणि कणखर पायांवर सांस्कृतिक जीवन आपल्या समस्त शाखांसहित निर्माण झालेले आहे. इस्लामी जनसमुदायाचे अस्तित्त्व अबाधित राहण्याची हमी केवळ याच बाबीवर अवलंबून आहे की, या समूहाच्या प्रत्येक सदस्याने ही विचार व्यवस्था समजून घ्यावी. हिचा आत्मा समजून घ्यावा आणि सांस्कृतिक जीवनाच्या प्रत्येक शाखा व विभागात या व्यवस्थेच्या आत्म्यास समजून कार्यात्मक अर्थ व स्वरुप प्रदान करण्याची शक्ती आणि ऊर्जा आपल्यात निर्माण करण्याची पात्रता असावी. विशेषकरून इस्लामी समूहाच्या बुद्धिवान (Intelligentia) जणांना तर सर्वांत जास्त या ज्ञान, कृती व कार्याची गरज असते. कारण हा विशेष बुद्धिमान वर्ग या समूहाच्या विशिष्ट राष्ट्रीय संस्कृतीच्या रंगात पूर्णपणे रंगलेला असावा. परंतु इस्लामी समूहास तर सर्वांत जास्त याचीच गरज आहे. कारण आपल्या व्यक्तित्वाचे आणि विशेषत्वाचे मूळ हे वर्ण, वंश, भाषा वगैरेंसारखी कोणतीच बाब नसून केवळ 'इस्लाम' हेच आहे. आपल्या प्रगती आणि अस्तित्वाचा केवळ हाच आधार आहे की, आपल्या समाजाचे सदस्य, विशेषत: बुद्धिमानवर्ग हा इस्लामी विचारसरणी आणि इस्लामी कार्यपद्धतीत मुरलेला असावा. यानुसार त्यांच्या शिक्षण व प्रशिक्षणात जेवढ्या त्रुटी असतील, त्यांचे प्रतिबिंब आपल्या समाजाच्या जीवनात जशास तसे दिसेल.

हे नाकारता न येणारे कटू सत्य आहे. परंतु ही वास्तविकता नाही काय की, सध्याच्या शिक्षण व्यवस्थेमध्ये इस्लामी जनसमूहाच्या शिक्षणाची जी व्यवस्था करण्यात आली आहे, ती नेमकी या जणसमूहाच्या मार्गदर्शनासाठी नसून नष्ट करण्यासाठीच करण्यात आली आहे? या विद्यालयात तुम्हाला तत्त्वज्ञान, विज्ञान, अर्थशास्त्र, विधीशास्त्र, इतिहास, राज्यशास्त्र आणि इतर ते सर्व विषय शिकविण्यात येतात की, ज्यांना बाजारात तर मागणी आहे. परंतु तुम्हास इस्लामी तत्वज्ञान, इस्लामी तत्वज्ञानाचे मूळ, इस्लामचे आर्थिक तत्त्व, इस्लामचे वैधानिक नियम, इस्लामचे राजकीय सिद्धान्त आणि इस्लामचा इतिहास वगैरे विषयांची हवासुद्धा लागली नाही, आणि लागूही दिली जात नाही. याचा परिणाम कसा आणि काय होतो? तुमच्या बुद्धीत

जीवनाची संपूर्ण आकृती आणि चित्र पूर्णत: बिगरइस्लामी रेखांवरच तयार होते. तुम्ही इस्लामेतर विचारसरणीच्याच प्रभावाखाली जीवनाच्या प्रत्येक विषयावर दृष्टी टाकता आणि अशा रितीनेच दृष्टी टाकण्यास विवश असता. कारण इस्लामी दृष्टिकोन तुमच्याकडे नसतोच मुळी. अगदीच विखुरलेल्या आणि किचकट स्वरुपात इस्लामविषयी काही माहिती तुम्हाला मिळतही असते परंतु ती माहितीच अप्रमाणित व कधीकधी तर व्यर्थ आणि अंधश्रद्धेची भेसळ असलेली असते. या प्रकारामुळे तुम्ही इस्लामच्या निकट येण्याऐवजी दूरच सरकतात. आपल्यापैकी जे लोक केवळ वडिलोपार्जित धर्म असल्याने अर्थात मुस्लिम वंशात वा परिवारात जन्मले असल्याने इस्लामविषयी गाढ श्रद्धा ठेवित आहेत, ते वैचारिकदृष्ट्या 'इस्लाम'पासून दूर होऊन अक्षरश: मुस्लिमेतर होतात. एवढे असूनही कसेबसे स्वत:चीच अशारितीने समजूत काढ़त असतात की इस्लाम हा सत्य धर्म असेलही, परंतु कदाचित आपल्या डोक्याबाहेरचा आहे. त्याचप्रमाणे ज्या लोकांतून ही श्रद्धाही लोप पावली, ते तर इस्लामची चेष्टा उड़विण्यासाठी कचरत नाहीत.

अशा पद्धतीचे शिक्षण घेताना तुम्हास वस्तुत: जे प्रशिक्षण मिळाले, ज्या वातावरणात तुम्ही वावरत असता आणि वास्तविक जीवनाच्या ज्या प्रकार व प्रकरणांशी तुमचा संबंध येत असतो, अशा प्रसंगी क्वचितच तुमच्या वागणूक व आचरणात इस्लामी कार्यपद्धतीची काहीशी चुणूक दिसून येत असेल. आता हे उघड आहे की, ज्या लोकांना ज्ञान व कृतीच्या स्वरुपात कधी इस्लामची माहितीच मिळालेली नसेल, ते फरिश्ते अथवा देवदूत थोडेच आहेत, की ते आपोआपच मुस्लिम होऊन उभे राहतील. त्यांना ईशवाणी तर होणार नाही की त्यांच्या अंत:करणात आपोआपच इस्लामचा साक्षात्कार होईल. ते वारा आणि पावसाच्या झोक्यातून इस्लामी प्रशिक्षण थोडेच घेऊ शकतील? विचार आणि कृतीतून इस्लामेतर असलेला फाजील अभिमान तुम्ही बाळगत असाल तर हा तुमचा मुळीच दोष नाही. हा दोष मुळात या शिक्षण व्यवस्थेचा आहे. कारण या व्यवस्थेतील शिक्षणप्रणालीच अशी आहे. वस्तुत: हे माझे निर्णायक मत आहे, की मागेच मी सांगितल्याप्रमाणे या विद्यालयात तुम्हास कत्तल करून ठार करण्यात येत आहे, त्याचबरोबर तुम्हास गाडण्यासाठी कबरी खोदून ठेवण्यात आल्या आहेत. ज्या समाजात व राष्ट्रात तुम्ही डोळे उघडले आहेत, ज्या समाज व राष्ट्राने तुमच्या शिक्षणासाठी अपार कष्ट झेलले आहे, ज्या समाजाचे यश हे तुमच्या यशावर अवलंबून आहे, ज्या समाजाच्या जीवनाशी तुमच्या जीवनाचा संबंध आहे; त्याच समाजासाठी व राष्ट्रासाठी तुम्हास कत्तल करण्यात येत आहे. जेणेकरून आपण विनासायास आणि कोणताही हेतु न पाळता आपोआपच तुमची प्रत्येक कृती आणि कार्य समाजाकरिता संकट व्हावे. एवढेच नव्हे तर तुम्हास वाटतही

असेल की, आपण आपल्या समाज व राष्ट्राचे कल्याण करावे, तर तेही तुम्हास शक्य होणार नाही. कारण तुम्हास त्याच्या स्वभाव आणि नियमांपासून अनभिज्ञ ठेवण्यात आले आहे, तसेच तुमची समस्त बुद्धिमत्ता आणि बौद्धिक प्रशिक्षण इस्लामी दिशेच्या विरुद्ध देण्यात आले आहे.

तुमचे हे स्थान आणि दर्जा जर तुमच्या लक्षात आला आणि जर तुम्हास याची पूर्णत: जाणीव झाली असेल, की खरोखरच किती भयानक ठिकाणी नेऊन आता वास्तविक कार्याच्या मार्गावर सोडून देण्यात येत आहे; तर मला खात्री आहे तुम्ही निश्चितच या गर्तेतून बाहेर निघण्याचे प्रयत्न सुरु कराल. झालेले नुकसान पूर्णपणे भरून काढणे तर खूप अवघड आहे, तरीसुद्धा याकरिता मी तुम्हास तीन गोष्टींचे मार्गदर्शनपर सल्ले देत आहे. यावर तुमचा फायदा निश्चितच होईल.

१) शक्य होईल तेवढे अरबी भाषा शिकण्याचे प्रयत्न करावे. कारण इस्लामचा स्त्रोतबिंदू अर्थात कुरआन याच भाषेत आहे. हे कुरआन जोपर्यंत त्याच्या मूळ भाषेत अभ्यासले जात नाही, तोपर्यंत इस्लामची विचारव्यवस्था पूर्णपणे तुम्हास समजणार नाही. अरबी भाषेची प्राचीन शिक्षण पद्धती आता कूचकामी ठरली असून आधुनिक शिक्षण पद्धतीचा वापर करून सहा महिन्यांत तुम्हास अरबीचे एवढे ज्ञान मिळेल तेवढा तुम्हास कुरआनाचा मजकूर लक्षात येऊ लागेल.

२) कुरआन, प्रेषितांची जीवनपद्धती आणि प्रेषित सोबत्यांच्या जीवनाचा अभ्यास करणे इस्लाम धर्म समजण्यासाठी अत्यावश्यक आहे. तुम्ही ज्या अर्थी आपल्या जीवनाची एवढी वर्षे इतर बाबीं शिकण्याकरिता खर्च केली आहेत, तेथे थोडासा वेळ इस्लाम समजण्यासाठीही खर्च करा. कारण यावरच इस्लामी जनसमुदायाचे मूळ आधारित आहे आणि याचे आकलन व अभ्यास केल्याशिवाय तुम्ही या समाज व राष्ट्राचे भले करुच शकत नाही.

३) जे काही चांगले वा वाइट मत तुम्ही चुकीच्या मार्गांनी मिळालेल्या इस्लामच्या माहितीवर निश्चित केले असतील, ती मते आपल्या विचारबुद्धीतून काढून टाका आणि खऱ्या पद्धतीने, खऱ्या मार्गाने आणि शास्त्रोक्त पद्धतीने (Systematic Study) इस्लामचा अभ्यास करा. मगच आपली इस्लामविषयी भूमिका ठरवा. तुमची प्रत्येक भूमिका बहुमोल आहे. सुशिक्षित लोकांना हे मुळीच शोभा देत नाही की, एखाद्याविषयी पूर्ण माहिती न मिळविताच आपली भूमिका ठरवावी. आता मी ईशदरबारी प्रार्थना करतो, की ईश्वर तुमची मदत करो आणि ज्या संकटात तुम्हास जखडण्यात आले, त्यापासून मुक्ती देवो. यावरोबरच मी आपले भाषण समाप्त करतो. (आमीन)

# प्रकरण पाचवे

## नवीन शिक्षण व्यवस्था

(हे भाषण ५ जानेवारी १९४१ इ. स. रोजी लखनौ येथील 'दारुल उलूम नदवतुल ओलेमा' या अरबी विद्यापीठात लेखक महोदय 'सय्यद अबुलआला मौदूदी' यांनी 'अंजूमन इत्तेहादे तलबा' या विद्यार्थी संघटनेसमोर दिले.)

मित्रहो! सुदैवाने मला अशा व्यासपीठावर भाषण देण्याची संधी मिळाली जेथे वर्तमानकाळात सर्वप्रथम इस्लामी शिक्षण व्यवस्थेत सुधारणा घड़वून आणण्याचा विचार निर्माण झाला तसेच या दिशेने सर्वांत पहिले पाऊल उचलण्यात आले. याच कारणास्तव मी या संधीसाठी आपल्या चर्चेचा विषय 'शैक्षणिक सुधारणा' निवडला आहे. हा विषय निवडण्यामागे आणखीन एक प्रेरणा आहे आणि ती अशी की, आपल्या धार्मिक विद्यापीठांत सामान्यत: 'शैक्षणिक सुधारणा'विषयी चर्चा रंगत आहे. यावरून हे स्पष्ट होत आहे, की सुधारणावादी मंडळींच्या बुद्धीत या प्रकरणाचे कोणतेच स्वरुप स्पष्ट झालेले नाही. लोकांना केवळ एवढ़ेच वाटते की, जुन्या आणि प्रचलित शिक्षण पद्धतींत केवळ एवढ़ीच कमतरता आहे, की अभ्यासक्रम आता खूप जुना झाला असून यामध्ये काही विषयांचा घटक काही इतर विषयांपेक्षा कमी वा अधिक झालेला आहे आणि आधुनिक काळातील काही आवश्यक विषय अभ्यासक्रमात समाविष्ट करणे आवश्यक झाले आहेत. शिक्षणांतील सुधारणाविषयी संपूर्ण चर्चा इतक्यापुरतीच मर्यादित होऊन बसली, की काही विषयांच्या ग्रंथांना वगळून इतर दुसरे विषय समाविष्ट करण्यात यावेत. शैक्षणिक घटकांतील प्रमाणात सुधारणा करुन काही घटक वगळून काही घटक समाविष्ट करण्यात यावेत. तसेच प्राचीन विद्या विषयांबरोबरच इतिहास, भूगोल, अर्थशास्त्र आणि राज्यशासन वगैरेंसारखे विषय विद्यार्थ्यांना शिकविण्यात यावेत. अशा प्रकारच्या वरवरुन सुधारणा घडवून आणण्यात येत आहेत. तसेच जे लोक अतिउत्साहात 'आधुनिक विचारसरणी'वर उतारुं होतात, त्यांचे असे मत असते की, प्रत्येक मौलवीला (अरबी विद्यापीठाचा पदवीधर) मॅट्रीकच्या इयत्तेपर्यंतची इंग्रजी भाषा शिकविण्यात यावी, जेणेकरून त्यांना टेलिग्रामचा मजकूर तरी कमीतकमी लिहिता-वाचता यावा. परंतु ही आधुनिकता जी आज दर्शविण्यात येत आहे, तीसुद्धा आता खूप जुनी झाली आहे. याचा जास्तीतजास्त केवळ एवढ़ाच फायदा होईल की, पूर्वी निघणाऱ्या विद्यार्थ्यांपेक्षा थोडी जास्त इंग्रजी येणारे विद्यार्थी आपल्या या विद्यापीठातून निघतील. हे विद्यार्थी काहीं प्रमाणात जर्मनी आणि अमेरिकी भाषासुद्धा बोलायला लागतील. परंतु केवळ एवढ्यावरून कधीच काही भागणार नाही. कारण या विश्वाच्या मार्गदर्शन आणि नेतृत्वाचा झेंडा इस्लामी विद्वानांच्या हाती असावा. म्हणून केवळ एवढ्याशा शैक्षणिक परिवर्तनामुळे काहीच साध्य होणार नाही. हे

नेतृत्व म्हणजे ऐहिक आणि पारलौकिक मार्गदर्शनाचे आहे. याच इस्लामी नेतृत्वामुळे समस्त विश्वाच्या मानवजातीस जगात सुखशांती आणि परलोकात मोक्ष मिळून स्वर्गप्राप्ती आहे. वस्तुस्थिती सांगावयाची असल्यास जगातील मानवजात नरकाग्नीकडे नेणाऱ्या विद्वानांचे नेतृत्व (Leadership) स्वीकारून आपले दोन्ही (अर्थात ऐहिक आणि पारलौकिक) जीवन नष्ट व उद्ध्वस्त करीत आहे. म्हणून या मानवजातीचे योग्य नेतृत्व करणाऱ्या इस्लामी नेत्यांच्या हाती ही धुरा येणे आवश्यक आहे. हे जर करायचे असेल अर्थात समस्त जगाच्या नेतृत्वाची धुरा यशस्वीपणे सांभाळायची असेल तर तुम्हास क्रांतिकारी साधनसामग्री मिळविण्यासाठी तयार व्हावेच लागेल. यासाठी योग्य शिक्षण पद्धतीची गरज असून पारंपरिक पद्धतीने चालत आलेली शिक्षण पद्धती पार नष्ट करून सर्व बाबींचा बारकाईने विचार करुन आधुनिक पद्धतीच्या इस्लामी शिक्षणाची मुहूर्तमेढ रोवावी लागेल. याकरिता कशा पद्धतीचे इस्लामी शिक्षण असावे जेणेकरून जगातील प्रत्येक ठिकाणच्या व प्रत्येक पंथ व वंश वा वर्णाच्या मानवजातीच्या कल्याणास्तव नेतृत्व करण्यास पात्र बनविणाऱ्या शिक्षण पद्धतीचा आराखडा आपल्यासमोर ठेवित आहे.

## १) ज्ञान आणि नेतृत्वातील संबंध

सर्वप्रथम या बाबीचा बारकाईने अभ्यास करावा लागेल की, 'इमामत' अर्थात नेतृत्व (Leadership) कोणत्या गोष्टीवर अवलंबून आहे. अखेर ती कोणती बाब आहे जिच्या बळावर कोण्या काळी 'इजिप्त' या देशाने समस्त जगाचे नेतृत्व केले आणि पूर्ण जगाने त्याचे नेतृत्व स्वीकारले. कोण्या काळी 'बाबिल' (Bebilon) या देशाने कशाच्या बळावर संपूर्ण जगाला आपले नेतृत्व स्वीकारण्यास भाग पाडले तर कधी काळी 'ग्रीस' या देशाने याच नेतृत्वाची धुरा कशाच्या आधारावर आपल्या हाती ठेवली आणि संपूर्ण जगाने त्याचे अनुकरण केले. कधी इस्लाम धर्म स्वीकारलेल्या जणांनी जगाचे नेतृत्व केले आणि संपूर्ण जग याच मार्गदर्शनावर वाटचाल करू लागले तर कधी 'यूरोप'ने जगाचे नेतृत्व करून समस्त मानवजातीस आपल्या प्रभुत्वाखाली ठेवले. मग याचे नेमके कारण काय आहे की, हे नेतृत्व विविध राष्ट्रांमध्ये स्थलांतरित होत गेले. हा केवळ योगायोग आहे की, याचे काही नियम आहेत? या प्रश्नावर जेवढा गंभीर विचार करण्यात येईल, त्याचे केवळ एकच उत्तर मिळते की, होय! हे नेतृत्व एका राष्ट्राकडून दुसऱ्या राष्ट्राच्या हातात स्थलांतरित होत गेले. त्याचे कारण हेच आहे की नेतृत्व परिवर्तनाचा एक तात्त्विक नियम आहे, एक सूत्र आहे. ते सुत्र हे आहे की नेतृत्वाचा ज्ञानाशी असलेला घनिष्ट संबंध. ज्या ठिकाणी योग्य ज्ञान असेल त्याच ठिकाणी नेतृत्व असेल. हेच ते साधे आणि सरळ सूत्र वा नियम होय. मानवास या जगातील ईशप्रतिनिधित्व केवळ ज्ञान असल्यामुळेच मिळालेले आहे आणि हीच प्रेरणा नेतृत्वामागे आहे. कारण इतर सर्व सजीवांमध्ये केवळ मानवालाच श्रवण, दृष्य

आणि विचारशक्ती सर्वांत जास्त प्रदान करण्यात आली आहे. या तिन्ही शक्ती इतर सजीवांना कमी प्रमाणात मिळाल्या आहेत. म्हणूनच मानवाची ही लायकी आणि पात्रता आहे की, कोणतीच मानवेतर शक्ती त्यास अधीन करू शकत नाही आणि मानव हा इतर सर्व सजीव आणि निर्जीव शक्तींना आपल्या अधीन करून घेण्याची पात्रता बाळगतो. याच कारणास्तव तो या विश्वात 'खलीफ़ा' अर्थात ईश्वराचा प्रतिनिधी होय.

## २) नेतृत्व बदलाचे सूत्र

या उत्तरामुळे आपोआपच आणखीन एक दुसरा प्रश्न आपल्यासमोर उभा राहतो, तो असा की, या 'ज्ञान' शब्दाचा अर्थ काय आहे? या प्रश्नाचे रहस्य श्रवण, दृष्य आणि विचार-शक्ती या तीन शब्दांत दडले आहे. दिव्य कुरआनात हे तिन्ही शब्द संक्षिप्तरीत्या पाहणे, ऐकणे आणि विचार करणे यासाठी वापरण्यात आलेले नसून श्रवण म्हणजे इतरांकडून पुरविण्यात आलेली माहिती मिळविणे, दृष्य म्हणजे स्वत: प्रयोग करून माहिती मिळविणे आणि विचार म्हणजे या दोन्हीं माध्यमांतून मिळालेली माहिती संपादित करुन योग्य निष्कर्ष काढणे होय. याच तिन्ही बाबीं एकत्र होऊन जे ज्ञान तयार होते, त्याच ज्ञानाची पात्रता मानवास ईश्वराकडून प्रदान करण्यात आली आहे. वस्तुत: सर्वच मानव याच तिन्ही शक्तींचा वापर करून काम चालवित आहे. याच कारणास्तव सृष्टीतील इतर सर्व वस्तूंवर मानवास प्रभुत्व मिळालेले आहे. थोडा आणखीन सपशेल विचार केल्यास ही बाब समोर येईल, की जो मानव व्यक्तीश: कमी प्रमाणात या तिन्ही शक्तींचा वापर करीत आहे, तो इतर दुसऱ्यांच्या प्रभुत्वाखाली व प्रभावाखाली वावरत आणि जगत असतो. अशा मानवास इतरांच्या ताब्यात राहावे लागते. इतरांचे अनुकरण करावे लागते. या उलट जो मानव या तिन्ही शक्तींचा इतरांपेक्षा जास्त वापर करतो, तो इतरांवर प्रभुत्व गाजवितो आणि इतरजण त्याचे अनुकरण करतात. नेतृत्व आणि मार्गदर्शनसुद्धा तोच करतो. परंतु हे नेतृत्व स्थलांतरित होण्याचे सूत्र माहीत करून घेण्यासाठी आपल्याला आणखीन जास्त खोलवर विचार करावा लागेल. या सखोल विचारांती आपल्यासमोर ही वास्तविकता येईल की, एखादा मानवसमूह मानवांचा नेता अशा वेळी बनतो जेव्हा ज्ञानाचा जास्तीतजास्त मोठा भाग या समूहाच्या वाट्यास येतो. याचे ऐतिहासिक पुरावेदेखील भरपूर आहेत. दुसरीकडे हा समूह आपल्यास अवगत असलेल्या ज्ञानाच्या आधारे अधिक माहिती पुरविण्यात लागलेला असतो, तर तिसरीकडे प्रथमोल्लेखित दोन्ही प्रकारची माहिती संपादित करून योग्य निष्कर्ष काढू लागतो आणि यांच निष्कर्शाच्या आधारावर कार्य करतो. पहिल्या दोन बाबी त्याच्या निष्कर्शाच्या आधारे चुकीच्या सिद्ध होतात. तो त्या चुकांत योग्य सुधारणा करतो आणि ज्या नवीन बाबीं त्याच्या ज्ञानपटलावर येतात, त्यांच्या आधारे तो त्यांचा जास्तीतजास्त वापर करण्याचा प्रयत्न करीत असतो. मग तोच समस्त मानवजातीचा

नेता बनतो. तसेच जे या गुणधर्मांना मुकतात त्यांच्या नशिबी दुसऱ्यांचे अनुकरण करणे येते. नशिबाने नेत्याच्या नेतृत्व स्वीकारण्यातून बचावला तरी अनुकरण करण्यापासून त्याची सुटका नाही. मग त्याची इच्छा असो वा नसो. या प्रभावशाली काळानंतर या समूहावर नेतृत्वऱ्हास होण्याचा काळ येतो. या वेळी तो थकलेला आणि मरगळलेला असतो. आपण केलेल्या थोड्याशा कार्यावरच समाधान मानून प्रयोगाच्या माध्यमाने आणखीन माहिती मिळविण्याचे आणि विचारशक्तीचा वापर करून योग्य निष्कर्ष काढण्याचे प्रयत्न सोडून देतो. तसेच त्याचे संपूर्ण ज्ञानरूपी भांडवल केवळ श्रवणशक्तीच्या माध्यमाने मिळणाऱ्या माहितीपर्यंतच मर्यादित होऊन बसते. त्याच्या दृष्टिकोनात ज्ञानार्जनाचा अर्थ हा केवळ एवढे माहीत करून घेण्यापुरताच मर्यादित होतो की, पूर्वी जी माहिती मिळाली होती आणि त्याआधारे जो निष्कर्ष काढण्यात आला होता, त्याचा अर्थ काय होता? आता तो या गैरसमजुतीस बळी पडतो, की जे ज्ञान पूर्वी हस्तगत करण्यात आले होते तेवढेच पुरेसे असून यात कोणत्याच नवीन बाबींचा समावेष करण्याची गरज राहिलेली नाही, तसेच ते शक्यही नाही. या ठिकाणी वा या अनुमानावर पोहोचल्यानंतर हा नेतृत्वशाली समूह नेतृत्वाच्या स्थानावरून बाजूला होतो अथवा त्याच्या हातून नेतृत्वाची धुरा हिसकावून घेण्यात येते. मग ज्या दुसऱ्या मानवसमूहाच्या हाती नेतृत्वाची धुरा येते, तो अधिकाधिक ज्ञान प्राप्त करून योग्य निष्कर्ष काढून अधिक जीवननिर्मितीचे उद्दिष्ट घेऊन पुढे सरसावतो आणि पूर्वी असलेला नेता या नवीन बळाच्या नेत्याचे निमूटपणे नेतृत्व स्वीकारतो. एवढेच नव्हे तर यास पुरातन विभागात ज्ञानाचे विश्लेषण करण्यासाठी पाठविण्यात येते.

## ३) वर्तमान इस्लामी शिक्षणातील मौलिक त्रुटी

या चर्चेतून स्पष्ट झालेली केंद्रीय बाब ही आहे की, 'नेतृत्व' मग ते नरकाग्नीकडे नेणारे असो, की स्वर्गप्राप्तीकडे नेणारे असो, ते अशा मानवसमूहाची मालकी आहे, ज्यात श्रवण, दृष्टा आणि विचार शक्ती इतर मानवांपेक्षा जास्त असते आणि इतरांपेक्षा जास्त या शक्तीचा वापर असतो. मानवाकरिता ईश्वराने हे अटळ सूत्र निर्माण केले आहे. यात कोणत्याच प्रकारच्या गफलतीची सूट नाहीच मुळी. कोणताही जनसमूह, मग तो ईश्वरज्ञानी असो की, ईश्वराचे अस्तित्व नाकारणारा असो, ही अट ज्याने पूर्ण केली त्याच्याच हाती विश्वाच्या नेतृत्वाची धुरा असेल आणि जो या अटीचे वा शर्तींचे पालन करणार नाही त्याच्या नशिबी दुसऱ्याचे नेतृत्व स्वीकारणे आणि अनुकरण करणे अनिवार्य ठरेल.

तुम्हास (अर्थात मुस्लिम समूहास) विश्वाच्या नेतृत्वाच्या स्थानावरून बाजूला सारून ईश्वरास खऱ्या अर्थाने न ओळखणाऱ्या पाश्चात्यांच्या हाती नेतृत्व आले कसे? त्याला कारणीभूत हेच सूत्र आहे. या अटीची पूर्तता न केल्यामुळेच तुमच्या हातून नेतृत्व हरवले. कारण

बऱ्याच काळापासून ज्ञानार्जनाची जी अवस्था तुमच्यात झालेली आहे, त्यात दृष्य आणि विचार या दोन्ही शक्ती लोप पावल्या होत्या. एवढेच नव्हे तर श्रवणशक्तीचा वापरसुद्धा प्राप्त माहिती पुरविण्यापर्यंतच मर्यादित झाला होता. या उलट आपला प्रतिस्पर्धी पश्चिमी राष्ट्र अर्थात यूरोप ज्ञानाच्या क्षेत्रात नव्या जोमाने पुढे सरसावला. त्याने तुमच्यापेक्षा जास्त श्रवणशक्तीचा वापर केला. दृष्य आणि विचारशक्ती वापराचे संपूर्ण कार्य मागील अडीच शतकांपासून एकटा यूरोपच करीत आहे. याचा निश्चितच परिणाम जो होणार होता तो झालाच. नेतृत्वाची धुरा आपोआप त्यांच्या हाती आली आणि तुम्ही अर्थात पूर्वीचे नेते या खंबीर नेत्याची शेपटी धरून चालण्यास विवश झाले.

आपल्या धार्मिक शिक्षण प्रणालीच्या नावावर चालणाऱ्या सर्व शिक्षण संस्था अजूनसुद्धा ही बाब समजण्यास तयार नसून आपल्या याच चुकीची पुनरावृत्ती करण्यासाठी अडून बसलेल्या आहेत. याच चुकीमुळे तुमची ही दुर्गत झालेली आहे, हे त्यांना कसे समजत नाही, हा एक परत संशोधनाचा विषय आहे. या संस्थांचालकांच्या दृष्टिकोनात ज्ञानाची परिभाषा ही प्राचीन आणि सुरुवातीच्या काळातील ज्ञानापर्यंतच मर्यादित झाली आहे. नदवा (हे अरबी विद्यापीठ) आणि 'अजहर' (इजिप्त देशाच्या कैरोमधील विद्यापीठ) ने शैक्षणिक सुधारणेच्या दिशेने पहिले पाऊल तर उचलण्याचा प्रयत्न अवश्य केला परंतु यातून केवळ एवढेच साध्य होणार आहे, की श्रवणशक्तीची सीमा वर्तमान ज्ञानाच्या मर्यादापर्यंत वाढेल आणि दृष्य व विचारशक्तीकडे कोणतेच लक्ष पुरविण्यात येणार नाही. अर्थातच यामुळे या दोन्ही महत्त्वाच्या शक्तींचा वापर होणारच नाही कारण त्यांचे अस्तित्वच नसेल. या पद्धतींच्या सुधारणांतून जास्तीतजास्त एवढा फायदा होणे शक्य आहे की, आजपर्यंत तुम्ही कमी प्रतीचे अनुयायी होते, आता उच्च दर्जाचे अनुयायी व्हाल. परंतु नेतृत्वाची धुरा सांभाळण्याचे स्वप्न कधीच पूर्ण होणार नाही. अर्थातच नेतृत्व करण्यासाठी उल्लेखण्यात आलेल्या शक्तींविषयी कोणी विचारही केल्याचे मला आढळले नाही. वास्तविक पाहता तुम्ही ईश्वरास खऱ्या अर्थाने जाणणारा व मानणारा समूह आहात म्हणून हे तुमचे अनिवार्य कर्तव्य आहे, की तुम्हीच जगाचे नेतृत्व करावे. परंतु अशा परिस्थितीत तुमच्याच्याने ते शक्य नाही. आपल्या पाश्चात्य प्रतिस्पर्ध्याकडून या नेतृत्वाची धुरा परत मिळवायची असेल तर या महान कार्यपूर्तीसाठी श्रवण, दृष्य आणि विचार या तिन्हीं शक्तींचा वापर करणे अनिवार्य ठरते.

## ४) शैक्षणिक सुधारणेचे स्वरुप कसे असावे?

वर मी उल्लेख केल्याप्रमाणे, 'ईश्वरास खऱ्या अर्थाने जाणणारा आणि मानणारा समूह हा हाच इस्लामी समूह होय आणि यामुळे हे तुमचे अनिवार्य कर्तव्य आहे की, तुम्हीच जगाचे नेतृत्व करावे, परंतु तुम्ही ही कर्तव्यपूर्ती तोपर्यंत पार पाडू शकत नाही जोपर्यंत तुम्ही या अटीची पूर्तता

करत नाही. माझी हीच भूमिका संपूर्ण चर्चेचा मूळ केंद्र बिंदू आहे. मला हीच बाब सविस्तरपणे समजावून देण्याची गरज भासत आहे. जर केवळ एक मानवी समूह असण्याच्या नात्यानेच फक्त नेतृत्व करावयाचा प्रश्न असता तर तुमच्या शिक्षण व्यवस्थेत सुधारणा करण्याची अथवा शिक्षणाचे नूतनीकरण करण्याची विशेष गरज नव्हती. याकरिता अलीगढ विद्यापीठात जाऊन आधुनिक शिक्षण घेता येते अथवा इजिप्त आणि ईराण वा तुर्कस्तानातील सरकारी विद्यापीठांचे दरवाजे उघडे आहेतच. परंतु केवळ नेतृत्वाचा प्रश्न नाही. केवळ अमेरिका अथवा यूरोपच्या नेतृत्वासारखे नेतृत्व आपल्याला कसे चालेल. आपण तर एकाच ईश्वराची भक्ती करणाऱ्या लोकांच्या बनलेला समूह आहे. करीता नेतृत्वाबाबतीत आपला उद्देश असा मुळीच नाही की, केवळ स्व-स्वार्थाकरिताच आपण नेतृत्व करावे. मग हे नेतृत्व नरकाग्नीकडे घेऊन जाणारे असो की स्वर्गाकडे घेऊन जाणारे असो. यूरोपशी आपली स्पर्धा केवळ यासाठी नाही की आपण त्याचे ऐहिक नेतृत्व हिरावून घ्यावे. तसेच केवळ नेतृत्वापुरतेही आपली त्याच्याशी स्पर्धा नाही, आपले त्याच्याशी भांडण केवळ उद्दिष्ट आणि तत्वाचे भांडण आहे. अर्थातच 'यूरोप' हा ईश्वराचा द्रोही आणि उपद्रवी असल्याकारणाने आपल्याला त्याचे प्रभुत्व असहनीय आहे. याउलट तुमचे अस्तित्वच मुळात एकमेव ईश्वरास मानून जगातील सर्व खोट्या देवतांचा प्रभाव संपुष्टात आणून जगात न्याय स्थापन करण्याकरिता आहे. एकमेव ईश्वराच्या आदेशपालनावरच तुमच्या धर्माचा आधार आहे. याच एकेश्वरवादी श्रद्धेमुळे तुमचे हे कर्तव्य आहे, की केवळ स्वत:च्याच मोक्षापुरता विचार न करता जगातील समस्त मानवजातीस अन्यायापासून मुक्त करून परलोकात मोक्ष मिळण्याचा मार्ग दाखवावा. हाच उद्देश आहे इस्लामी नेतृत्वाचा. हे कर्तव्य आपण तोपर्यंत पार पाडू शकणार नाही जोपर्यंत नेतृत्वाची ही धुरा 'युरोप'च्या हातून घेत नाही. येथे वांशिक वा भौगोलिक स्वरुपाचा कुठलाही प्रकार नसून तंटा मात्र उद्देशाचा आणि तत्वांचा आहे. ईशद्रोह्यांचे नेतृत्व जर अमेरिकी, ब्रिटिश अथवा जापान्यांचे असेल तर तेसुद्धा यूरोपच्या नेतृत्वाप्रमाणेच नष्ट व नेस्तनाबूद करण्यास पात्र ठरेल. कारण ईशद्रोही तत्त्वांवर आधारलेले नेतृत्व कधीच या जगात न्याय आणि शांती प्रस्थापित करु शकत नाही. या पुण्य कर्माकरिता एकेश्वरवादाचेच नेतृत्व आवश्यक असते.

## ५) ईशद्रोही नेतृत्वाचे दुष्परिणाम

एखादे नेतृत्व ऐहिक आणि पारलौकिक कल्याणास्तव असण्याची भीस्त ही एकेश्वरवाद अथवा ईशद्रोह या दोन बाबींवर आधारित आहे. ज्या वेळी एखादे ईशद्रोही राष्ट्र आपले कार्य आणि बुद्धिमत्ता व साकल्याच्या बळावर जगाचे नेतृत्व करतो, तेव्हा ते समस्त श्रवणीय, दृष्य आणि विचारशक्तींना या दृष्टिकोनानुसार संपादित करतो की, या विश्वमंडळाचा कोणीच प्रभु वा ईश्वर नाही आणि मानव हा केवळ एक बेजवाबदार

(Irresponsible) आहे. जगातील सर्व वस्तु त्याचीच मिळकत आहे. या वस्तु आणि बाबींपासून काम करून घेण्याचा उद्देश आणि पद्धत निश्चित करण्याचेही त्यालाच अधिकार आहे. त्याचप्रमाणे त्याच्या सर्व प्रयत्नांचा अंतिम उद्देशही केवळ एवढाच आहे, की इतर सर्वांनी सेवा करावी, गुलामी करावी आणि त्याच्या लाड़ाचे चोचले पुरवावेत. माहिती या आधारावर म्हणजेच चुकीच्या आधारावर संपादित करण्याचे असे दुष्ट आणि भयानक होतात, की वैचारिक तत्त्व आणि कार्यात्मक तत्त्व या दोन्ही बाबींचे अस्तित्व एकेश्वरवादाच्या आदेशाचे पालन करण्याच्या अगदीच विरुद्ध आहेत. हीच तत्त्वे समस्त जगातील मानवजातीच्या मनमस्तिष्कावर घर करून बसतात. यामुळेच केवळमात्र भौतिकवादी नीतीमत्ता आणि दुराचरणाची शृंखला निर्माण होते. याचाच परिणाम म्हणून मानवांतील बंधुभाव नष्ट होऊन स्वस्वार्थ वाढीस लागतो. मानवांदरम्यानचे संबंध याच सूत्रांवर आधारण्यात येतात. याच्याच अनुसार मानव आपल्या शक्तींच्या वापराचा उद्देश निश्चित करतो. एकूणरीत्या संपूर्ण मानवी जीवनाचा प्रवाह अशा वळणावर वाहात जातो की, आपल्या अंतिम लक्ष्यावर पोहोचून या ऐहिक जगातच नरकाग्नीच्या प्रकोपाची सुरुवात होते आणि याची प्रचिती आपण आपल्या डोळ्यांनी पाहतो आहोतच.

या ईशद्रोही विचारसरणीचा जोपर्यंत या जगातील वैचारिकता, नीतीमत्ता, संस्कृती आणि इतर सर्वच बाबींवर असामान्य प्रभाव असेल, तोपर्यंत या ईशद्रोही विचारसरणीच्या अस्तित्वामुळे एकेश्वरवादावर आधारित असलेल्या प्रत्येक बाबीस कोणताच वाव नसतो. इतकेच नव्हे तर लोकांच्या विचारसरणीचा दृष्टिकोनसुद्धा विपरित असतो. मानवी ज्ञान व माहितीचे बिघड़लेले स्वरुपही याविरुद्ध साक्ष देतात. नीतीमत्तेची सर्व तत्त्वे आणि मूल्ये पायादंळी तुड़विली जातात, कारण संपूर्ण मानवजातीमध्ये पारलौकिक श्रद्धा नष्ट पावते. परिणामी प्रत्येकजणात बेजवाबदारपणा निर्माण होतो, कारण पाप-पुण्याचा जाब देण्याचा येथे प्रश्नच नसतो. समस्त मानवताच ईशद्रोहाच्या तालावर समाजाच्या नियमांची आणि मानवी नाते व संबंधांची होळी करून अनैतिकतेच्या झिंगेत मनसोक्तपणे शिमगा खेळत असते. या शिमग्यामध्ये कोणाचेही कोणालाच भान नसते आणि स्वत:चेही बान नसते, कारण झिंगच तशी चढ़लेली असते. प्रत्येक जण एक दुसऱ्याच्या अंगावर मनसोक्तपणे चिखलफेक करीत असतो. लज्जा आणि शरम न बाळगता स्वैर व्यभिचार करू लागतो. आपल्याच मानवबंधूचे रक्त अगदीच क्षुल्लक फायद्यासाठी सांडतो. जीवनाचा हा प्रवाह अगदी उलट दिशेने मानवजातीस बळजबरी वाहून घेऊन जातो.

जो समूह वैचारिक क्षेत्राचा नेता बनतो आणि विश्व प्रकृतीच्या शक्तींना आपल्या विज्ञान वा विद्येच्या बळावर ताब्यात घेऊन अथवा वश करून घेऊन त्यांच्याकडून काम करवून

घेतो, अशा समूहाचे नेतृत्व केवळ विचारिक सीमांपर्यंतच मर्यादित राहत नसून जीवनाच्या प्रत्येक भागास प्रभावित करते. विश्वभूमीवर त्याचे प्रभुत्व स्थापित होते. उपजीविकेच्या तिजोरीच्या किल्ल्या त्याच्या हातात येतात. त्याचा सर्वत्र आदेश चालतो. आपला वैचारिक दृष्टिक्षेप मानवी जीवनाच्या ज्या क्षेत्रावर टाकतो, ते क्षेत्र प्रभावित होते आणि त्या दृष्टिकोनानुसारच चालते. आता हे स्पष्ट आहे की, या जगावर आणि जगाच्या व्यवहारावर ज्या समूहाचा प्रभाव आहे, आणि हा समूह ईशमार्गाविरुद्ध आहे, अशा वेळी यदाकदाचित एखादा समूह ईशमार्गाकडे येत असेल तर त्याचे अस्तित्वच संकटात सापडते, किंवा या समूहाची दिशा बळजबरी ईशविरोधी दिशेकडे वळविण्यात येते. आपल्याला जर याचे वाईट वाटतच असेल तर काय करणार. तुम्हालासुद्धा नाईलाजास्तव ईशविरोधी मार्गाकडे जावेच लागणार.

## ६) वर्तमान परिस्थिती

नेमकी हीच परिस्थिती सध्या आपल्यावर आलेली आहे. तुमच्या हातून नेतृत्वाची धुरा हिसकावून घेतल्यानंतर ही धुरा यूरोपच्या हाती आली आणि यूरोपने ज्ञान-विज्ञान क्षेत्रात कमालीची प्रगती केली आणि त्याने या नेतृत्वाची दिशा ईशद्रोहाकडे (Theobophobia) वळविली. याच ईशद्रोही दृष्टिकोनानुसार त्याने सर्व श्रवणीय माहिती गोळा करून, विश्वाचा अभ्यास केला. याच दृष्टिकोनाच्या अधीन होऊन माहिती संपादन करून निष्कर्ष काढले. याच ईशद्रोही दृष्टिकोनानुसार त्याने जीवनाचा उद्देश, नीतीमत्तांचे नियम, वैयक्तिक आणि सामूहिक आचरणाचे कायदे ठरविले आणि याच ईशद्रोही दृष्टिकोनानुसार सर्व राष्टांचा वापर निश्चित केला. मग याच विद्येच्या बळावर तो उठला आणि आपली विजयी दृष्टी टाकली, तेव्हा राष्ट्र काय आणि समाज काय, मानव काय आणि प्राणी काय सर्वच त्याच्या अधीन होत गेले. तसेच दुसरीकडे या प्रभावी नेत्याकडे अरालेलेच ज्ञान, नैतिक, दृष्टिकोन, संस्कृती आणि कायदे व नियम संपूर्ण जगावर लागू झाले. त्याच नेत्याचे विचार आणि सिद्धान्त जगाने स्वीकारले. आता परिस्थिती अशी आहे की, एखादे मूल जेव्हा वयात येते, त्याच वेळेस त्याच्या बुद्धिपटल आणि जीवनाचे निर्माण यूरोपियन नेतृत्वाच्याच अधिपत्याखाली होत आहे. श्रवणीय माहिती याच पद्धतीने त्याच्या बुद्धीत उतरत जाते. प्रयोगासाठी हाच दृष्टिकोन त्यास मिळत असतो. सत्य आणि असत्य, खरे आणि खोटे, स्वीकारणीय आणि अस्वीकारणीय बाबीं, या सर्वांच्या निश्चितींचे हेच प्रमाण वा कसोटी त्याच्याकडे असते. नीतीमत्तेची तीच तत्त्वे, जीवनाचे तेच उद्देश आणि प्रयत्नांचा तोच मार्ग त्याच्याकडे असतो. आपल्या सभोवतालच्या परिसरातील संपूर्ण कारखाना याच पद्धतीवर चालत असलेला दिसतो. मग अशा पद्धतीने जेव्हा त्याचा विकास होतो, तेव्हा ज्या वेळी तो आपले जीवन याच स्वरुपाच्या यंत्राचा एक भाग (Spare part) बनून कार्य करतो, कारण या यंत्राशिवाय दुसरे कोणतेच यंत्र त्याच्या समोर नसते.

ईशद्रोही असलेल्या या संस्कृती व सभ्यतेच्या पूर्ण प्रभावांमध्ये प्रथम तर हीच समस्या आहे की, एकेश्वरवादी जीवनाचा दृष्टिकोन, उद्देश आणि नैतिकतेचे नियम हे कोणत्याच मार्गाने मनमस्तिष्कात बसत नाहीत, कारण ज्ञान व कौशल्याची संपूर्ण रचना आणि जीवनाची पूर्ण दिशाच विरुद्ध बाजूला असते. काही लोकांमध्ये जरी ही सत्य कल्पना रूजली तरी सभोवतालचे वातावरण त्याकरिता प्रतिकूल असते. त्याला ज्ञानाचे समर्थन कधीच मिळत नाही. जगात चालणाऱ्या व्यवहारातसुद्धा याला कोणतेच स्थान मिळत नाही. मागील पाच शतकांत मानवास हस्तगत झालेली माहिती संपादित करणे आणि त्यापासून निष्कर्ष काढणे वगैरेचे संपूर्ण कार्य ईशद्रोही लोकांनीच केले. एकेश्वरवादाच्या सिद्धान्तानुसार संपादन आणि निष्कर्षाचे कार्य झालेच नाही. या कालावधीत मानवाने ज्या ज्या शक्ती वशीभूत करून घेतल्यात त्या शक्तीसुद्धा ईशद्रोह्यांनीच वापरात घेतल्या. भौतिक शक्ती जेवढ्या आत्मसात झाल्या, त्यासुद्धा ईशद्रोहांच्याच स्वार्थाकरिता वापरल्या गेल्या. जेवढे नवनवीन शोध आणि संशोधने झाली आणि त्यातून जे मानवाने आत्मसात केले, त्यावर पूर्णत: ईशद्रोहीच काबीज झालेत व या समस्त शक्तींचा सत्यविरुद्धच पुरेपूर वापर करून घेण्यात आला. म्हणूनच अपेक्षेनुसार तेच घडले, जे घडणे होते. हाच शाप मानवजातीस लागला. अर्थात ईशद्रोही नेत्याच्याच आदेश व मर्जीवर या शक्तींचा वापर झाला. ईशद्रोह्यांच्याच नैतिक कायद्यानुसार असलेली सामूहिक व्यवहाररचना आणि कार्यात्मक-प्रणाली लागू झाल्या असून सत्याच्या विरोधात या शक्तीचा वापर करण्यात आला. म्हणूनच कार्यात्मक जीवनाच्या प्रत्येक चित्रात ईशद्रोही रंगाचाच प्रभाव दिसून येतो. अर्थात वर्तमान मानवी समस्यांच्या निराकरणासाठी या नेतृत्वाजवळ काहीच शिल्लक नाही. ही दुसरी गोष्ट आहे की, ही दुर्दैवी अवस्था पाहून कोण्या सज्जनाने संन्यास घ्यावा अथवा वैराग्य पत्करावे आणि पाच शतकापूर्वीचे वातावरण अनुभवावे. नसता वर्तमान जगाच्या व्यवहारात एका जीवंत अथवा सजीव ज्याचे अंत:करण जागृत आहे आणि आत्मा शाबूत आहे, अशा मानवास प्रत्येक पावलावर भयानक संकटांचा सामना करावा लागणार. त्याची श्रद्धा, नैतिकता सर्वकाही सत्याचा मार्गावर असूनही प्रत्येक वेळी आणि प्रत्येक क्षणी आपल्या श्रद्धा, विचार आणि मानवी मूल्यांना पायदळी तुडवून चालणेच भाग पडते. नवीन माहिती मिळाल्यावर वास्तविकता (Facts) ईशद्रोहाच्या सिद्धान्तापासून पार विभक्त करणे, त्याच्याकरिता अत्यंत कठीणच नव्हे तर अशक्यप्राय: होऊन बसते. म्हणून इच्छा नसूनही तो असत्य व अमानवी सिद्धान्ताचा बळी पडतो. त्याला या गोष्टीची जाणीव पण राहत नाही की, त्याला देण्यात येणाऱ्या अमृतामध्ये किती प्रमाणात विष मिसळून देण्यात येत आहे. याचप्रमाणे जीवनाच्या कार्यात्मक व्यवहाराशी त्याचा संबंध येतो, त्या वेळी त्याच्या समोर एक भयानक प्रश्न आ वासून उभा असतो की, आता नेमका कोणता मार्ग स्वीकारावा. बऱ्याच सामूहिक विचारसरणी ज्या मूळ सत्याधिष्ठाविरुद्ध असतात आणि सत्य व मानवी मूल्याविरुद्ध असतात,

त्याच्या मनमस्तिष्कावर बळजबरी कोरण्यात येतात. कारण जगामध्ये सर्वत्र याच सत्यविरोधाचे चलन आणि बोलबाला आहे. बऱ्याच कार्यात्मक प्रणाली सत्याविरुद्ध दिसत असूनही त्या स्वीकार करण्यासाठी हा सत्यनिष्ठ मानव विवश होतो. कारण या शिवाय दुसरा कोणताच पर्याय त्याच्यासमोर नसतो. बऱ्याच वाईट आणि दुष्ट मार्गांवर त्याला केवळ याकरिताच चालावे लागते.

## ७) नेतृत्व बदलासाठी शिक्षणात क्रांती आवश्यक

सज्जनहो! ही आहे सत्य परिस्थिती आणि वास्तविकता, ज्यामध्ये तुम्ही फसलेले आहात. तुम्हास वाटत असेल की या गर्ततेतून बाहेर पडावे तर आधी या चार बाबींवर विचार अवश्य करावा.

प्रथमत: हे की, जुनी, प्राचीन आणि जुन्याच श्रवणी ज्ञानापर्यंत मर्यादित असलेल्या या शिक्षण व्यवस्थेत मुळात लायकी व पात्रताच नाही की तुमच्यात विश्वनेतृत्वाचे गुण (Skill) निर्माण करावेत. तुम्हाला वाटत असेल की, मानवजातीच्या कल्याणास्तव एकेश्वरवादावर आधारित सत्यधर्म अशाच प्रकारे प्रत्येक क्षणी मिटत मिटत जगातून नष्ट होईल तर मनसोक्तपणे याच प्रचलित असलेल्या पारंपरिक शिक्षणप्रणालीचा स्वीकार करत बसा.

द्वितीय असे की, ईशद्रोही नेतृत्वाच्या प्रभुत्वाखाली आणि ईशद्रोही विचारसरणी व सिद्धान्तावर आधारित यंत्राचा एक भाग (Spare part) बनून राहणारा विवश मानव तयार करणारे हे ज्ञान आणि शिक्षण पद्धती मुळात ईश्वराचा इन्कार करण्यासाठी अंगदी रामबाण उपाय ठरतो. या शिक्षण व्यवस्थेवर आधारित मुस्लिम विद्यापीठ, इस्लामी महाविद्यालय अथवा इस्लामी हायस्कूलसारख्या शब्दांचा प्रयोग करणे म्हणजेच विषाच्या बाटलीवर अमृताचे लेबल लावण्यासारखे आहे.

तसेच इस्लामी शास्त्राच्या अभ्यासक्रमाबरोबर कोणताही अभ्यासक्रम जोडणे म्हणजे ५५ टक्के निरर्थक ठरते आणि पाच टक्के जरी फायदा होत असला तरी ईशद्रोहाच्या मार्गावर चालताना ईश्वराचे नामस्मरण करण्याइतपतच त्याचा लाभ होईल.

चौथी बाब, शैक्षणिक सुधारणेच्या नावावर तजविज समोर आली की, इस्लामी विद्याशास्त्रांसोबत नवीन विषय जोडण्यात यावे, यामुळेसुद्धा काहीच साध्य होणार नाही. कोणीच विश्वनेतृत्वाच्या लायकीचा तयार होणार नाही. कारण विज्ञान, तत्त्वज्ञान, इतिहास, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र व इतर नवीन संपादित झालेले सर्व विषय ईशद्रोही नेत्यानेच (यूरोपने) रचलेले व तयार केलेले आहेत. या विषयांत हीच ईशद्रोही प्रेरणा कार्यरत आहे. ही दळभद्री प्रेरणा

सत्याधिष्ठित विचारसरणीतून पृथक करणे, दुसऱ्या अर्थाने अमृतास विषातून पृथक करणे आहे. कोणत्याही विद्यार्थीसाठीच काय शिक्षकासाठीही अशक्यप्राय: आहे. अशा प्रकारच्या शिक्षण पद्धतीमुळे दोन विरुद्ध दिशांना एकत्र करण्यासम आहे. जुन्या विषयाने प्रभावित होणारा विद्यार्थी मौलवी बनून निघेल, आधुनिक विषयांनी प्रभावित होणारा विद्यार्थी 'कॉमरेड' वा 'कम्युनिस्ट' बनून निघेल, तर काही विद्यार्थी दोन्ही विचारसरणींच्या मधोमध जखडून राहतील.

मी सादर केलेल्या शिक्षणाच्या समीक्षणात्मक अढाव्यात तुमच्यापैकी कोणाला त्रुटी आढळत असल्यास किंवा मी चूक करीत असल्यास अवश्य अंगुलीनिर्देश करावे. परंतु जर तुम्ही पूर्णपणे माझ्या भूमिकेशी सहमत असाल तर जागतिक नेतृत्वाची धुरा सांभाळण्यासाठी शिक्षणातील आवश्यक असलेले बदल केल्यावाचून गत्यंतर नाही. या तिन्ही प्रकारच्या शिक्षणप्रणाली सोडून नवीन अभ्यासक्रम संपादित करण्याची नितांत आवश्यकता आहे. अगदी प्राथमिक शिक्षणापासूनच याची तयारी करावी लागणार आहे.

## ८) नवीन शिक्षण व्यवस्थेचा आराखडा

या क्रांतिकारी सुधारणेची आवश्यकता सिद्ध केल्यावर मी आपणासमोर याचा स्पष्ट आराखडा सादर करीत आहे.

**पहिले वैशिष्ट्य :** नवीन शिक्षण व्यवस्थेसाठी आवश्यक असलेली पहिली बाब ऐहिक आणि धार्मिक शिक्षणातील वैविध्य नष्ट करून त्यांना एकजीव करणे आहे.

धार्मिक ज्ञान आणि ऐहिक ज्ञान दोन्ही आपसात वेगवेगळे करणेच धर्माचे दोन तुकडे करण्यासम आहे. अर्थातच ही संकल्पना इस्लामविरोधी शक्तींच्या विचारसरणीचे द्योतक आहे. इस्लाम धर्म ज्या विषयास 'धर्म' या नावाने संबोधित करतो, ते ऐहिक जीवन प्रणालीच्या विरुद्ध अथवा धर्मापासून विभक्त असलेली बाब नाहीच. इस्लामचा मुळात दृष्टिकोनच असा आहे, की ऐहिक जीवनातील मानवी आणि सामाजिक व्यवहार अथवा माणसाची वैयक्तिक आणि सामूहिक जीवनपद्धती ही ईश्वरी आदेशानुसारच असावी. अर्थात हे जग सर्वस्वी एकमेव ईश्वराचे ब्रह्मांड असल्याने ईश्वरी राज्य आहे. त्यानुसार प्रत्येक मानव हा एकमेव ईश्वराचीच रयत आणि प्रजा आहे. ईश्वरी आदेशांवर आणि नियम वा कायद्यावरच या जगातील प्रत्येक मानवाने आपल्या जीवनाचे आचरणकार्य करावे. याच जीवनपद्धतीचे नाव इस्लाम धर्म (सत्यमार्ग) आहे. म्हणूनच ऐहिक जीवनाचा कोणताही विषय या सत्यधर्मापासून विभक्त नाहीच मुळी. मग ऐहिक विषयांत विज्ञान असो, तत्त्वज्ञान असो, अर्थशास्त्र असो, इतिहास-नागरिकशास्त्र असो अथवा बीजगणित-भूमिती असो. या विषयांना धार्मिक विषय न संबोधता

केवळ कर्मकांड आणि पूजा-अर्चांच्या पद्धतींनाच धार्मिक विषय संबोधने हा धर्माच्या प्रती घोर अन्याय व अपमान आहे. हाच अन्याय आणि अपमान करण्याचा अक्षम्य अपराध आपण करीत आलो आणि परिणामी विद्यार्थी हा ऐहिक व्यवहार आणि धर्म या दोन्ही बाबी आपसात विरुद्ध समजू लागला. त्याच्या मनमस्तिष्कावर एवढा विपरित परिणाम झाला की,

"धर्मामध्ये पूर्णस्वी दाखल व्हा." (दिव्य कुरआन)

या ईश्वरी आदेशाचा त्याला अर्थच समजला नाही.

उदाहरणार्थ - आपण इतिहास, भूगोल, भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, जीवशास्त्र, गणित, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र आणि इतर समस्त विषय विद्यार्थ्यांना अशारीतीने शिकवितो, की त्यात ईश्वराचे नावच नाही. या विषयात ईश्वराचे अस्तित्व कोठेच दिसत नाही, भौतिक नियमांच्या निर्मितीच्या या स्वरुपात कोठेच उल्लेख होत नाही, की ही सृष्टी व ब्रह्मांड ईश्वराची निर्मिती असून त्याच्याच आदेशानुसार क्षणाचीही तफावत न करता सृष्टीची प्रत्येक वस्तु कार्यरत आहे. कार्यात्मक ज्ञानामध्येही कोठेच या उद्दिष्टाचा उल्लेख आढळत नाही, की या सृष्टीकार्यप्रणाली ईश्वराच्याच इच्छा व मर्जीच्या अधीन राहून कार्यरत आहेत. जीवन व्यवहाराविषयीसुद्धा मानवनिर्मितीचे मुख्य उद्दिष्ट कोठेच स्पष्ट होत नाही की, या जीवनाचा मुख्य हेतु हा ईश्वराची मर्जी संपादन करणे आहे. जीवन व्यवहारात कोठेच या नियमाची पुसटशी कल्पनाही येत नाही, की व्यवहार चालविण्यासाठी ईश्वरनिर्मित व्यवहार नियमांचा उपयोग करावा. जीवनाविषयी चर्चेत या ईश्वरी स्त्रोताचा उल्लेखच दिसत नाही. ज्ञान-विज्ञानाच्या या संपूर्ण सामूहिक चर्चेतून विद्यार्थ्यांच्या बुद्धीपटलावर जी कल्पना असेल ती मुळात ईश्वरी अस्तित्वापासून मुक्त आणि विभक्त असेल. प्रत्येक वस्तु आणि प्रत्येक घटकाचा परिचय हा निर्मात्या ईश्वरापासून विभक्त आणि मुक्त असेल. मानवाची प्रत्येक प्रकारची वाटचाल ईश्वरी मार्गदर्शनाविरुद्ध तो स्वतःहून तयार करेल. अशा ईश्वरहीन कल्पना घेऊन आणि सत्यविरहित संकल्पना घेऊन ज्या वेळी तो निर्मात्या व पालनकर्त्या ईश्वराचे नाव ऐकेल आणि ईश्वरी नियमांवर आधारित जीवनव्यवस्था व जीवनहेतु, नैतिक कायदे व इस्लामी विधीचे शिक्षण घेईल, तेव्हा त्याच्या आकलनात ही बाब मुळीच येणार नाही की या आराखड्यात ईश्वरास कोठे बसवावे. या विरोधाभासामुळे त्याची बौद्धिक आणि मानसिक दुरवस्था पार शिगेला पोहोचेल. सर्व प्रथम त्याच्या बुद्धी आणि आकलनशक्ती समोर हा प्रश्न उभा राहील की, ईश्वराच्या अस्तित्वाचा पुरावा काय आहे? खरोखरच या ईश्वराचे मार्गदर्शन आवश्यक आहे काय? त्याच्याकडून खरोखरच मार्गदर्शन मिळत असते काय? अर्थात या सर्व विचित्र परिस्थितीतही त्याच्यासमोर या दोन विरुद्ध दिशेला वाहणाऱ्या शिक्षण प्रवाहास एकाच

दिशेने बळजबरी वळविण्याचा प्रयत्न केल्यास, अर्थात ऐहिक आणि धार्मिक शिक्षण अयोग्य पद्धतीने दिल्यास आणि काळ्या व पांढऱ्या रंगास एकत्र केल्यास हा इस्लाम धर्म त्याच्या जीवनाशी सुसंगत नसणार. मग तो विद्यार्थी कितीही श्रद्धावान आणि धार्मिक का असेना.

ही जी स्फोटक परिस्थिती आपणास पाहवयास मिळते, त्याचे नेमके हेच कारण आहे. अर्थात अशा प्रकारचे काळे पांढरे एक करून ऐहिक व पारलौकिक एक करून शिक्षण देण्याची शिक्षण पद्धतीच इस्लामविरुद्ध आहे. नवीन शिक्षण व्यवस्थेत धर्म शिक्षणाचे विषय वेगळे न ठेवता सर्वच विषय धार्मिक शिक्षणात समाविष्ट करण्यात यावेत. विद्यार्थ्यांस ऐहिक व्यवहाराचा परिचय अशारीतीने करून द्यावा की जणू तो ईश्वराची रयत आहे. त्याच्या स्वत:च्या अस्तित्वावर आणि समस्त सृष्टीवर ईश्वराचाच आदेश चालत आहे. प्रत्येक घटक आणि अणूरेणूमध्ये व प्रत्येक कणांमध्ये सुरु असलेल्या कार्यात त्याला ईश्वरी नियम आणि तत्त्वाची पूरेपूर जाणीव व्हावयास पाहिजे. त्याच्या स्वत:चा आणि प्रत्येक घटकाचा संबंध ईश्वराशीच असून ब्रह्मांडाच्या समस्त व्यवहार कार्यामध्ये एकमेव ईश्वरच मूळ कर्ताधर्ता आहे, ही जाणीव त्यास व्हावयास पाहिजे. ऐहिक जीवनात जेवढ्या शक्ती त्याला मिळालेल्या आहेत आणि ज्या वस्तु त्याच्या अधीन करण्यात आल्या आहेत, त्या सर्व एकमेव ईश्वरानेच त्यास प्रदान केलेल्या आहेत. या सर्व शक्ती आणि साध्य असलेल्या वस्तुंचा वापर ईश्वराच्याच इच्छे व मर्जीनुसार आणि मार्गदर्शनानुसार वापरणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे या वापर कार्याचा जाबसुद्धा ईश्वरासमोर त्याला द्यावाच लागेल.

सुरुवातीच्या काळात तरी याशिवाय असा इतर कोणताच दृष्टिकोन विद्यार्थ्यांसमोर आणता कामा नये की माहितीची रचना व संपादन, सत्याचा सत्यार्थ आणि वस्तुस्थितीची कल्पना तर पूर्णत: इस्लामी दृष्टिकोनावरच आधारित असेल. परंतु याचबरोबर या दृष्टिकोनाविरुद्ध असलेले संपूर्ण सिद्धान्त समीक्षा करुन त्याच्यासमोर ठेवण्यात यावे आणि त्यास समजावण्यात यावे की, हे चुकीचे आणि इस्लामविरुद्ध वा सत्या विरोधी सिद्धान्त पूर्वीच्या ज्या मानव समूहाने स्वीकारले होते, तो याच कारणास्तव मार्गभ्रष्ट होऊन ईश्वराचा कोप त्याच्यावर झाला. याचे उदाहरण दिव्य कुरआनातील प्रथम सूरह अर्थात 'सूरह-ए-फातेहा'च्या अंतिम आयतीत देण्यात आले आहेच.

याचप्रमाणे कार्यात्मक जीवनाशी संबंधित विषयाच्या एकूण ज्ञानाचा आधार हा जीवनहेतु, नैतिक कायदे, कार्यपद्धतीसारख्या बाबीतील इस्लामी प्रणालीवर असावा आणि इतरांच्या जीवनपद्धती अर्थात इस्लामेतर जीवनपद्धती विद्यार्थ्यांना अशा रितीने शिकविण्यात याव्यात की, त्यांचा वैचारिक आधार, अंतिम लक्ष्य आणि कार्यमार्ग इस्लामच्या कोणकोणत्या

बाजूस सुसंगत आणि विसंगत आहे. शिक्षणातील सर्व विषयांना धार्मिक विषयांत समाविष्ट करण्याची हीच पद्धत आहे. या पद्धतीने ज्या ज्या वेळी तुम्ही विद्यार्थ्यांना शिक्षण द्याल, त्या वेळी धर्म शिक्षणाचे वेगळे विषय तुम्हास शिकविण्याची गरज भासणार नाही.

**दुसरे वैशिष्ट्य :** ह्या शिक्षण व्यवस्थेचे जे दुसरे वैशिष्ट्य असावयास हवे ते खालील प्रमाणे, आजपर्यंत प्रचलित असलेली प्रत्येक विद्यार्थ्यांस 'मौलाना' संबोधून त्याच्या तोंडून निघणाऱ्या प्रत्येक शब्दास 'फतवा' संबोधण्याची पद्धत विद्यार्थ्यांतून संपवून टाकण्यात यावी. याच्या ठिकाणी शिक्षणविशेषाची ती पद्धत अवलंबण्यात यावी जी वर्षानुवर्षानंतरच्या प्रयत्नातून जगात यशस्वी ठरली आहे. मानवाने या क्षेत्रात आता एवढी प्रगती केली आहे, की यामध्ये इतक्या शाखा निर्माण झाल्या आहेत की, एका व्यक्तीसाठी या सर्वांचा अभ्यास अशक्य झालेला आहे. अर्थात सर्वच ज्ञानशाखांचे अल्पसे ज्ञान जर त्यास देण्यात आले तर तो कोणत्याच विषयात परिपूर्ण राहणार नाही. याकरिता एकच उपाय आहे आणि तो असा, सुरुवातीच्या आठ-दहा वर्षांच्या अभ्यासक्रमात केवळ इस्लामी विचारसरणीवर आधारित ऐहिक जीवन आणि मानव व त्याच्या जीवनशास्त्राविषयी शक्य तेवढी माहिती पुरविण्यात यावी. त्याच्या मनमस्तिष्कात विश्वाची 'ती' कल्पना रुजविण्यात यावी जी एका परिपूर्ण मुस्लिमाकरिता अनिवार्य असते. जीवनाचा 'तो' आराखडा त्याच्या बुद्धीपटलावर शिक्क्यासारखा रुजविण्यात यावा जो एका सच्च्या मुस्लिमाच्या जीवनाचा खऱ्या अर्थाने असतो. कार्यात्मक जीवनासंबंधी 'त्या' संपूर्ण माहितीचा खजिना पुरविण्यात यावा जो एका मानवासाठी आवश्यक असतो. संपूर्ण माहिती एका मुस्लिम मानवाच्या पद्धतीने वापरण्याची प्रेरणा व पात्रता निर्माण व्हावी. त्याला त्याची मातृभाषाही अवगत व्हावी. अरबी भाषेचे कमीतकमी इतके ज्ञान त्याला साध्य व्हावे की, या आधारे त्याला अरबी ग्रंथांचा अभ्यास करणे शक्य व्हावे. एखाद्या पाश्चात्य भाषेचेही शिक्षण देण्यात यावे, जेणेकरून पाश्चात्य भाषेत असलेली माहिती अवगत करता यावी. या नंतर विशेष विभागाच्या (Faculty) शिक्षणासाठी सहा-सात वर्षांच्या कालावधी संशोधनात्मक कार्यासाठी देण्यात यावा आणि या विशेष प्रशिक्षण संपादन केलेल्या विद्यार्थ्यांस या विषयातील 'डॉक्टरेट'ची पदवी देण्यात यावी. उदाहरणास्तव काही विषयासंबंधी शाखा आणि शिक्षण पद्धतीबाबतीत मी सविस्तर माहिती देण्याचा प्रयत्न करेन. यावरून तुमच्या लक्षात येईल की शिक्षणाच्या शाखा विशेषाची संकल्पने बाबतीत माझी भूमिका कोणती आहे.

एक विशेष विभाग (Faculty) 'तत्वज्ञान' आणि 'बुद्धीशास्त्र' या विषयांवर आधारित असावा. या शिक्षण विभागात विद्यार्थ्यांना सुरुवातीस कुरआनशास्त्र शिकवावे, जेणेकरून या

माध्यमाने विद्यार्थ्यांना हे माहिती व्हावे की, मानवांच्या इंद्रियांमार्फत ज्या बाबींचे ज्ञान मिळते, त्या बाबींच्या अगदी उगमस्थानी असलेले अथवा दडलेले सत्य आणि वास्तविकता जाणून घेण्याचे साधन काय आहे. मानवाच्या बुद्धिमत्तेची मर्यादा काय आहे आणि वास्तविक असलेल्या संकल्पनांवर कल्पनांची इमारत उभी करण्यासाठी हा मानव कशा प्रकारे घटीत घटना आणि वास्तवांच्या जगापासून विभक्त होऊन अथवा डोळेझाक करून विचार आणि कल्पनांच्या काळ्याकुट्ट अंधारात चाचपडत आहे. विषयाबाबतीत किती ज्ञान मानवाकरिता आवश्यक आहे, या आवश्यक ज्ञानापर्यंत मजल मारण्यासाठी निरीक्षण (Observation) आणि (Induction) च्या आधारे कशाप्रकारे कार्य करून घ्यावे. कोणत्या बाबी निश्चित करता येतील, कोणत्या बाबतीत आणि नेमक्या आदेशापुढे आपणास जाता येणार नाही आणि कोठे जाऊन संक्षिप्त स्वरुपास वर्णणात्मक स्वरुपात बदलण्याचा प्रयत्न निरर्थक ठरतो. एवढेच नव्हे तर हेच कल्पनास्वप्न मानवास भुलभुलैयामध्ये भटकवित असते. या आधारास स्थिर आणि स्थायी व मजबूत केल्यानंतर विद्यार्थ्यांस तत्त्वज्ञानाच्या इतिहास शिकविण्यात यावा आणि या ठिकाणी दिव्य कुरआनाच्या तत्त्वज्ञानाआधारे त्यास संपूर्ण धर्मांच्या तत्त्वज्ञानाची स्वरुपे दाखवून देण्यात यावे, जेणेकरून त्याला स्वत: चांगलेच कळून चुकावे, की वास्तवापर्यंत पोहचण्यासाठी जी माध्यमे मानवास प्रदान करण्यात आली आहेत, त्यांचा वापर न करता अथवा त्यांचा चुकीचा वापर करून कशा प्रकारे मानव सतत भटकतच राहिला आहे. कशा प्रकारे त्याने आपल्या आकलन सीमांच्या बाहेरील वस्तु आणि घटकांना नियम लागू केला आहे आणि याचे कोणते परिणाम त्याच्या जीवनावर पडले आहेत. कशा प्रकारे त्याने आपल्या ज्ञानेंद्रिय आणि बुद्धीच्या मर्यादा निश्चित न करताच वास्तव आणि वस्तुस्थितीला निश्चित करण्यात वेळ वाया घातला. अर्थातच वस्तुस्थितीपर्यंत पोहोचणे त्याच्या ऐपतीबाहेर आहे. भारतीय तत्त्वज्ञानी, ग्रीक तत्त्वज्ञानी आणि जगातील इतर सर्वच तत्त्वज्ञानींनी कोणत्या ठिकाणी वास्तव समजण्यात चूक केली, कोठे कोठे ठेचाळलेत आणि कोठे कोठे भटकलेत, तसेच कोणत्या ठिकाणी मुस्लिम तत्त्वज्ञान कुरआन तत्त्वज्ञानाला सोडल्यावर कशा प्रकारे भटकलेत, मुस्लिम वक्त्यांच्या व अधिव्याख्यात्यांच्या विविध विद्यालयांनी शतकानुशतके जे विषय चर्चेच्या ऐरणीवर ठेवले त्यात दिव्य कुरआनचे मार्गदर्शन कोणकोणत्या ठिकाणी सोडून देण्यात आले. आध्यात्मिक तत्त्वज्ञानाच्या विविध पंथांनी संक्षिप्ताला वर्णणात्मक करण्याच्या भानगडीत पडून इस्लामी अध्यात्माचा आत्माच बिघडवून टाकला. यूरोपमध्ये तत्त्वज्ञानावर आधारित विचारसरणीतून कोणकोणते विक्षिप्त मार्ग निवडून केवळ एकाच वास्तवाचा आणि एकमेव सत्याचा शोध घेण्यासाठी किती धर्म आणि कितीतरी पंथ कशा प्रकारे अस्तित्वात आले, या विभिन्न धर्म आणि पंथांमध्ये सत्य आणि

वास्तवाचे प्रमाण तरी किती आहे आणि असत्याची भेसळ किती जास्त आहे आणि या विषारी घटकांच्या भेसळीमध्ये नावापुरत्याच असलेल्या सत्याचा सूक्ष्म घटक कसा लोप पावला आहे. या तत्त्वज्ञानामध्ये आकलन शक्तीच्या बाहेर असलेल्या कोणत्या अशा कल्पना आहेत ज्या यूरोपियन तत्त्वज्ञानामध्ये समाविष्ट होऊन सत्याचा नाश झाला. यामुळेच मानवी नीतीमत्ता आणि मानवी मूल्ये नष्ट पावली. त्यांनी ईशग्रंथ अर्थात दिव्य कुरआनच्या मार्गदर्शनात काम केले असते तर अशक्त बुद्धीचा वापर करून योजिलेल्या कल्पनांच्या चक्रीवादळात सापडले नसते आणि चुकीच्या आधारावर जीवनाचा आधार ठेवून इमारत उभी केलीच नसती. या संपूर्ण अभ्यासानंतर विद्यार्थ्यांनी आपल्या संशोधनातून निष्कर्ष काढावा आणि जेव्हा विद्यावंत पंडिताने पूर्णत: आपले कौशल्य सिद्ध करावे. तेव्हाच त्यास 'तत्त्वज्ञान' विषयातील पदवी प्रदान करण्यात यावी.

एक दुसरा विभाग (Faculty) 'इतिहास'विषयी असावा. या विषयात कुरआनातील इतिहासाचे तत्त्वज्ञान, उद्दिष्ट, इतिहास आकलन आणि इतिहसातील कालखंड वगैरे विद्यार्थ्यांना शिकविण्यात यावे. यामुळे त्याच्या बुद्धीतून समस्त वैरभाव नष्ट होईल. यामुळे तो वास्तवाकडे शुद्ध दृष्टिकोनातून पाहण्याच्या लायकीचे होतील. कारण त्यांच्या डोळ्यांवर भेदभाव वा वैरभावाचा कोणत्याच रंगाचा चश्मा नसेल. केवळ आपल्याच स्वदृष्टीने ते सत्याचे सूक्ष्म निरीक्षण करतील आणि यावरून शुद्ध निष्कर्ष आणि परिणाम त्यांना मिळतील. मानवजातीची उत्पत्ती मानवी संस्कृतीच्या प्रगती व उत्थानाचा अभ्यास करून मानवाचे यश आणि अपयश, सुदैव आणि दुर्दैव, प्रगती आणि ऱ्हास वगैरेचे नियम व तत्त्वे त्यांना समजावावीत. ज्या पद्धती व कायद्यावर आधारित असते त्याची माहिती मिळवून जी आचरणशैली व गुणधर्म मानवास यशाच्या शिखरावर नेऊन पोहोचवितात आणि तसेच जे दुर्गुण मानवास नष्टतेच्या खोल गर्तेत नेऊन सोडतात; त्या आचरणशैली व गुणधर्म व दुर्गुणांची सखोल माहिती त्यांना मिळावी. विद्यार्थ्यांना स्वत: आपल्या उघड्या डोळ्यांनी पाहता यावे, की कशारीतीने प्रकृतीची अशी एक सरळमार्गी रेषा सुरुवातीपासून आजपर्यंत अगदी सरळ ओढलेली दिसते की, जी मानवाच्या उत्तुंग प्रगतीचा मार्ग आहे. हे लक्षात येणे महत्त्वाचे आहे की या रेषेवरून एक पाऊलसुद्धा ज्याने बाहेर काढून वाटचाल केली अथवा रेषामर्यादा ओलांडून डाव्या वा उजव्या दिशेस दूर निघून गेला, त्यास याची शिक्षा भोगून कशाप्रकारे सिहांवलोकन करून परत या सरळमार्गी रेषावर यावे लागले. नसता तो असा फेकला गेला की, त्याचे नामोनिशानही कुठेच बाकी राहिले नाही. या अभ्यासप्रणालीद्वारे जेव्हा विद्यार्थ्यास कळून चुकेल की, ईश्वराचा नियम व कायदा किती सडेतोड आणि किती नि:पक्षपातीपणे व कोणताच भेदभाव न बाळगता मानव समूहांशी व्यवहार केला, अर्थात कोणत्याही मानवसमूहाचे

फाजील लाड करण्यात येणार नाही व कोणत्याही मानव समुहाविषयी त्याच्या मनात वैरत्व नसेल. प्रत्येक राष्ट्र आणि मानव समूहावर नि:पक्ष दृष्टिक्षेप असेल. तसेच यश आणि अपयशाच्या स्थायी नियमांच्या कसोटीवर घासून खरे व खोट्यास विभक्त करून समोर ठेवील. या बौद्धिक प्रशिक्षणानंतर त्यास ऐतिहासिक दस्तावेज आणि प्राचीन वस्तु तसेच मूळ स्त्रोतापासून स्वत:हून योग्य निष्कर्ष निर्वाळा काढ़ण्याचा सराव करून घेण्यात यावा. त्याचप्रमाणे त्यांच्यात इतकी लायकी व पात्रता निर्माण करण्यात यावी की, त्यांना मार्गभ्रष्ट इतिहासकारांनी रचलेल्या कलंकित इतिहासातील मजकूरातून सत्य इतिहास विभक्त करून सड़ेतोड़ व नि:पक्ष भूमिका सादर करता यावी.

आणखीन एक विभाग (Faculty) 'समाजशास्त्र'विषयी असावा. या विभागात सर्वप्रथम कुरआन आणि प्रेषित चरित्राच्या अनुसार मानवी संस्कृती व सभ्यतेची मूळ तत्त्वे शिकविण्यात यावीत. यानंतर वर्णणात्मकरीत्या या तत्त्वांच्या अनुसार ईश्वराने पाठविलेल्या सर्व प्रेषितांच्या मार्गदर्शनातून ज्या संस्कृती व सभ्यता उदयास आल्या होत्या. त्या विचारसरणीद्वारे साकल्यपूर्ण विचार करून हे दाखविण्यात यावे, की या मूळ तत्त्वांवर (Fundamental Principle) आधारित कशा प्रकारे एक उच्च नीतीमूल्य असलेला समाज, अर्थव्यवस्था, राज्य व्यवस्था, देशाचा कारभार आणि आंतरराष्ट्रीय संबंधाची इमारत उभी राहते. मग हे दाखवून द्यावे की, कशा रितीने याच नियमांवर या इमारतीचा आणखीन विस्तार करता येईल, तसेच या बाबींचा साकल्यपूर्ण विचार करून या इमारतीच्या विस्तारीकरणाचे स्वरुप आणि आराखडा तयार करण्याची पद्धत कशी असेल. मानवी ज्ञानाच्या प्रगतीद्वारे नवीन शक्तींचा शोध लागतो आणि संस्कृतीच्या प्राकृतिक प्रगतीद्वारे जी नवीन कार्यपद्धती निर्माण होत असते. त्या सर्व ईश्वराने घालून दिलेल्या मर्यादांचा आंत राहून या नैतिक व उच्चतम संस्कृतीत समाविष्ट करून तसेच आपापल्या योग्य ठिकाणी स्थानापन्न करण्याची कोणती पद्धत असेल. याच्या एकीकडे विद्यार्थ्यास भूतकाळातील मानवसमूह आणि मुस्लिमांच्या सांस्कृतिक इतिहासांचा अभ्यास करवून घेण्यात यावा जेणेकरून त्यास हे दिसून यावे की, संस्कृतीच्या या मौलिक तत्त्वांवर आणि ईश्वरी मर्यादांवर राहण्याचे परिणाम काय होतात आणि याचे उलंघन करण्याचे परिणाम कसे भोगावे लागतात. तसेच दुसरीकडे विद्यार्थ्यांना आधुनिक काळातील राजकीय, आर्थिक, सामाजिक सिद्धान्त व कार्यांचा समीक्षणात्मक अभ्यास करवून देण्यात यावा जेणेकरून त्यांना स्पष्ट दिसावे की मानवाने ईश्वरी मार्गदर्शनास सोडून स्वत:च तयार केलेल्या जीवनमार्गावर चालण्याचे दुष्परिणाम काय आहेत.

विज्ञानाच्या विविध शाखांसाठी काही विभाग (Faculties) वेगळे असावेत. या विषय विभागात दिव्य कुरआनच्या शिकवणीच्या आधारे केवळ आतापर्यंत साध्य झालेल्या वैज्ञानिक ज्ञानाचा वेध न घेता प्रकृती गुणधर्माच्या वाढीव संशोधनाचे कार्यसुद्धा दिव्य कुरआनच्याच मार्गदर्शनात करण्यात यावे. दिव्य कुरआन हे विज्ञानाचे ग्रंथ नसले तरी आणि विज्ञानाशी प्रत्यक्ष या ग्रंथाचा प्रत्यक्ष संबंध नसला तरी शेवटी हा ग्रंथ अर्थात दिव्य कुरआन सृष्टीनिर्मात्या ईश्वरानेच लिहिलेला असून हा लेखकरुपी ईश्वर आपल्या या कुरआन ग्रंथात जागोजागी यांची उदाहरणे आणि संदर्भ देत असतो. याकरिता विज्ञानाच्या सखोल अभ्यासाने विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना केवळ विश्व व्यवस्थेचे मूळ सूत्र माहिती होऊन चालणार नाही तर याही पुढे जाऊन जवळपास प्रत्येक विज्ञान शाखेत एक वास्तविक 'आरंभबिंदू' (Starting Point) आणि शोध प्रयत्नासाठी एक बरोबर आणि अचूक 'दिशा' (Direction) सुद्धा मिळावी. हीच मुळात मुख्य चाबी (Master Key) असून यामुळे संशोधनाचे द्वार उघडले जाऊन सरळमार्ग सापडतो. यानुसारच संपूर्ण समस्या व अडचणी संपून संपूर्ण रहस्यांचा उलगड़ा होतो. वर्तमान विज्ञानात गुंता व अड़चण आणि मार्गभ्रष्टता असण्याचे एक मोठे आणि मुख्य कारण हेच आहे, की विज्ञानाद्वारे संशोधक वस्तुस्थितीच्या वास्तवाच्या निरीक्षण मर्यादांपर्यंत तर पोहोचतो मात्र जेव्हा तो वस्तुस्थितींना जोडून जे सिद्धांत सादर करतो तेव्हा विश्व सृष्टीच्या मूळस्त्रोत बिंदुपासून अज्ञानी असल्या कारणाने जागोजागी आणि पावलोपावली ठेचाळत असतो. यामुळे बऱ्याचशा मानवी शक्ती विनाकारण वाया तर जातातच शिवाय तो जेव्हा हे चुकीचे सिद्धान्त मानवी सभ्यता आणि संस्कृतीत समाविष्ट करून आचरण कार्याचा पाया उभारतो, त्या वेळी संस्कृतीत निर्माण होणाऱ्या उपद्रवाचे न शमणारे वादळ उठते. या उलट दिव्य कुरआनच्या क्रांतिमय मार्गदर्शनात जेव्हा एखादा मुस्लिम वैज्ञानिक सिद्धप्राय: वास्तवांना सिद्धान्तापासून विभक्त करून संपादित करेल आणि आणखीन जास्त वास्तवांचा शोध लावून त्यांपेक्षाही जास्त परिणाम सिद्ध आणि सत्य सिद्धान्त सादर करील तेव्हा निश्चितच हे मानव विश्व वैज्ञानिक मार्गभ्रष्टता सोडून सत्य मार्गावर येईल.

ज्या ज्ञान विषयांना या वेळी धार्मिक ज्ञान म्हटले जाते, यांच्यासाठीही वेगवेगळे विभाग तयार करण्यात यावेत. उदाहरणार्थ, एक विभाग (Faculty) दिव्य कुरआनच्या संशोधनात्मक अभ्यासाचा असावा. यामध्ये भूतकाळातील कुरआनचे विश्लेषण व वर्णन करणाऱ्या लेखकांच्या लेखनकार्याचा सूक्ष्म अढावा घेऊन दिव्य कुरआनच्या या समस्त शिकवणीं साध्या व सोप्या भाषेत मानवांसमोर ठेवण्याचे कार्य सुरु ठेवावे. विविध पैलुंनी कुरआनच्या ज्ञानाचा सखोल आणि सूक्ष्म अभ्यास करण्यात यावा याचप्रमाणे एक विभाग प्रेषित कार्यप्रणालीचा असून त्याचासुद्धा उपरोलेखित पद्धतीनेच अभ्यास व्हावा. एक विभाग (Faculty) विधीशास्त्राचा असावा.

यामध्ये कुरआनचे नियम व आदेश, प्रेषित प्रणालीची वर्णणात्मक कार्यशैली, प्रेषित सोबत्यांची साकल्यपद्धती वगैरे बाबींवरून मिळालेल्या मजकुराचा सूक्ष्म आणि सर्वांगी अभ्यास असावा. याबरोबरच जगातील इतर वर्तमान आणि भूतकाळातील राष्ट्र वा मानवसमूहाचे विधान आणि नियम व्यवस्थांचा सूक्ष्म व समीक्षणात्मक अभ्यास करून समाजजीवनाची संबंधित व्यवहार व समस्यांची जोड इस्लामी विधानाशी लावून इस्लामी विधीशास्त्राच्या मूळ स्त्रोतांना जारी करण्यात यावे. हे विधान स्त्रोत शतकानुशतकांपासून आटून गेलेले आहेत. या विषय विभागाच्या अभ्यास कार्याने खूप मोठे पुण्यकार्य घडेल. तसेच या कार्याचा भरपूर लाभ इतर दुसऱ्या सर्व विषय विभागांना मिळेल कारण याच्याच आधारावर ज्ञानाच्या समस्त मार्गात शोध व संशोधनाचे आणि परिपूर्ण व अंतिम निष्कर्षाचे सुरु राहील.

**तिसरे वैशिष्ट्ये :** वरील मजकुरात मी केवळ काही उदाहरण म्हणून विषय विभागांचा उल्लेख यासाठी केला आहे, यावरून शिक्षणाचे सर्वांगीन स्वरुप तुमच्या लक्षात यावे. आता मी या नवीन शिक्षण व्यवस्थेचे महत्त्वाचे आणि अंतिम वैशिष्ट्य आपल्यासमोर ठेवणार आहे. ते उद्दिष्टहीन शिक्षण नसावे. आज जे आपल्या भारतात वर्तमान काळात प्रचलित आहे. या व्यवस्थेत शिक्षक आणि विद्यार्थी हे दोन्हीही घटक आपल्या उद्देश्याची प्रखर जाण असलेले असावेत. या दोन्हीं घटकांच्या दृष्टीसमोर नेहमीच एक ठराविक हेतु आणि जीवनाचा स्पष्ट उद्देश तसेच प्रयत्न व कार्याचे अंतिम लक्ष्य स्पष्ट असावे. अर्थातच या सर्वांना एकेश्वरवादी नेतृत्वाची मुहूर्तमेढ़ रोवण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्टा करावी लागणार आहे. हा उद्देश या व्यवस्थेत असे कार्यरत असेल, जसे की मानवी शरीराच्या प्रत्येक विभागात आत्मा कार्यरत असतो. विद्यार्थ्यांचे वैयक्तिक जीवन, त्यांचे सामूहिक व्यवहार, त्यांचे खेळणे बागड़णे आणि मनोरंजन व अभ्यास आणि संशोधनाच्या समस्त कार्यांमध्ये हाच आत्मा कार्यरत असावा. याच आत्म्यानुसार विद्यार्थ्यांच्या आचरण आणि जीवनपद्धतीचे निर्माण करण्यात यावे. याच मुळावर त्यांच्या नीतीमत्तेचा आधार ठेवण्यात यावा, तसेच संपूर्ण वातावरणाची निर्मितीच अशी करण्यात यावी की प्रत्येकजण हा धर्मयोद्धा असावा.

## ९) अपेक्षित परिणाम

अशा प्रकारचे शिक्षण व प्रशिक्षण घेऊन जे विद्यार्थी तयार होतील, त्यांच्यात एवढ़ी पात्रता आणि लायकी निर्माण होईल, की ते या सत्य विरोधी प्रवाहाची दिशाच बदलून टाकतील, गती बदलून टाकतील आणि मार्गभ्रष्ट ज्ञान व संस्कृतीचे मूळ आपल्या समीक्षणात्मक शोध अभ्यासाच्या हत्यारानी उपटून टाकतील. त्यांनी संपादित केलेल्या ज्ञान व विज्ञानात इतके बळ असेल, की जी मंडळी आज मार्गभ्रष्ट विचारसरणीशी निष्ठा ठेवून आहे, त्यांना इस्लामी दृष्टिकोनाकडे खेचून आणतील. या विद्यार्थ्यांचे संशोधनात्मक निष्कर्ष यूरोप, अमेरिका आणि

जपान यासारख्या राष्ट्रांना पूर्णपणे प्रभावित करतील. या नवीन शिक्षण व्यवस्थेतून तयार झालेल्या विद्यार्थ्यांनी संपादित केलेला जीवनदृष्टिकोन आणि जीवनसूत्र आपल्या संपूर्ण शक्ती व ऊर्जेसहित समस्त विश्वाच्या मानवांस प्रभावित केल्याशिवाय राहणार नाही. कार्यात्मक जीवनात सत्य दृष्टिकोनासमोर कोणताच दृष्टिकोन तग धरू शकणार नाही. मग याच नवीन शैक्षणिक धोरणातून अशा आचरणवृत्तीचे लोक निर्माण होतील, जे नेतृत्व व्यवस्थेत अभूतपूर्व क्रांती घडवून आणतील. ते या क्रांती आणण्याच्या कौशल्यालाही पूर्णत: आत्मसात केलेले असतील आणि क्रांतीच्या प्रेरणेने त्यांचे अंत:करण ओतप्रोत भरलेले असेल. त्यांना आपली ही क्रांतिकारी चळवळ इस्लामी मार्गावर चालविण्याची कलासुद्धा आत्मसात असेल. मग यांच्यात एवढी पात्रताही असेल की, ते यशाच्या उत्तुंग शिखरावर पोहोचल्यावर इस्लामी नियमांनुसार एक राज्य (State), एक परिपूर्ण जीवनव्यवस्था इस्लामी आत्म्यासहित निर्माण करतील. जेणेकरून त्यांना संपूर्ण विश्वामध्ये नेतृत्व करण्याची शक्ती आणि बळ प्राप्त होईल.

## १०) या पुण्यकार्यातील समस्या व अडचणी

सन्माननीय विद्यार्थी मित्रहो! या ठिकाणी पोहोचल्यावर अतिशय कठीण स्वरुपाच्या तीन समस्या मला जाणवतात. माझा शिक्षणसल्ला ऐकतेवेळेस तुमच्याही मनात या समस्यांचे काहूर माजले असेलच.

### अ) पहिली समस्या

**अभ्यासक्रम व शिक्षकांचे निर्माण :** पहिला प्रश्न असा आहे की, ही नवीन शिक्षण व्यवस्था कशा प्रकारे उभी करावी? कारण हा नवीन स्वरुपाचा अभ्यासक्रम शिकविणारे शिक्षक उपलब्ध तर नाहीतच, शिवाय या नवीन अभ्यासक्रमाची पुस्तकेसुद्धा उपलब्ध नाहीत. एवढेच नव्हे तर अगदी पहिलीच्या विद्यार्थ्यांसाठीसुद्धा या धोरणाचे शिक्षक आणि अभ्यासक्रमाची पुस्तके उपलब्ध नाहीत. तर या समस्येवर जो उपाय आहे, तो हा आहे की, ज्याप्रमाणे एका सुरेख आणि सुंदर व मजबूत इमारतीच्या निर्माणासाठी जशी विटांची भट्टी लावून विटा निर्माण करण्यात येतात, त्याचप्रमाणे या नवीन शैक्षणिक धोरणाची इमारत उभी करण्यासाठी एक प्रशिक्षण केंद्र तयार करणे आवश्यक आहे. या प्रशिक्षण केंद्रातून विशिष्ट शिक्षक आणि शिक्षणतज्ञ निर्माण करण्यात यावे. कारण तयार आणि प्रशिक्षित शिक्षकवर्ग कोठेच उपलब्ध नसतोच. जुन्या स्वरुपाच्या शिक्षकांनाच या नवीन शैक्षणिक धोरणाचे प्रशिक्षण देऊन उत्तम प्रतीचा शिक्षकवर्ग आपल्याला तयार करता येईल. त्यांना विशेष प्रकारचे बौद्धिक आणि नैतिक प्रशिक्षण देऊन त्यांच्यातील उपलब्ध शिक्षण कौशल्याची दिशा इस्लामी दिशेकडे वळविण्यात यावी. अर्थात हाच शिक्षकवर्ग शोध अभ्यासामुळे तयार होईल आणि नवीन शैक्षणिक धोरणाचे उद्दिष्ट सहज साध्य होईल.

## ब) दुसरी समस्या

**विद्यार्थी पुरवठा :** दुसरा प्रश्न असा आहे की या नवीन शिक्षण धोरणासाठी विद्यार्थी मिळतील काय? या शिक्षण प्रणालीत विद्यार्थी आकर्षित करण्यासाठी आवश्यक असलेल्या बाबीं कोणत्या आहेत? कारण ही नवीन शिक्षण व्यवस्था वर्तमान संस्कृती सभ्यता आणि राज्य व्यवस्थेची सेवा करण्यास पात्र विद्यार्थी तयार करणारी नाही. यामुळे शिक्षण घेऊन निघालेल्या विद्यार्थ्यांना रोजगार वा नौकरी मिळणार नाही. पैसा कमावून दोन वेळची भाकरी मिळविण्याची सोय या शिक्षणामुळे होणार नाही, अशीच भावना सामान्यजनांत आहे. मग ही प्रतिकूल परिस्थिती पाहून असे किती पालक आहेत, जे या नवीन शैक्षणिक धोरणावर आधारित विद्यालयात आपल्या पाल्यांना दाखल करतील. कारण येथून निघाल्यावर विद्यार्थ्यांचे भविष्यच त्यांना अंधकारमय दिसत आहे. परंतु ज्या लोकांचा शैक्षणिक उद्देश हा केवळ रोजगार मिळवून भाकरी तोडण्याचाच आहे, त्यांनी या शिक्षण प्रणालीपासून विभक्त राहिलेलेच बरे! अशा शिक्षणासाठी केवळ अशा सज्जनांची गरज आहे जे आपली संतती आणि मुले सत्यासाठी समर्पित करण्याचा हेतु आपल्या अंत:करणात बाळगतात. निश्चितच अशा पुण्य हेतुने प्रेरित असलेले लोक कमी संख्येत का असेनात उपलब्ध आहेत. पन्नास विद्यार्थी जरी या विद्यालयासाठी उपलब्ध झाले तर हे कार्य सुरु करण्यास हरकत नाही. इतक्या वर्षानुवर्षे इस्लामचा डका वाजविणाऱ्या या मुस्लिम समाजात जर ही भावना निर्माण होत नसेल तर मग दुसरे एखादे राष्ट्र या पुण्यकार्याची जबाबदारी उचलेल.

## क) तिसरी समस्या

**अर्थ पुरवठा :** तिसरी आणि अंतिम समस्या ही आहे की, या कार्यासाठी आवश्यक असणारा निधी कोठून उपलब्ध करावा? याचे साधे आणि सरळ उत्तर असे आहे, की ज्या लोकांकडे इस्लामी श्रद्धा आणि अर्थ संपत्ती या दोन्ही बाबीं उपलब्ध आहेत आणि एवढी विवेकशीलता आणि बुद्धिमत्तासुद्धा आहे की, त्यांना आपल्या संपत्तीचा यथायोग्य उपयोग समजत असेल तर प्रश्नच मिटला. जर हेसुद्धा शक्य नसेल तर रात्रंदिवस इस्लाम धर्माच्या लोप पावण्याच्या वेदनांनी कन्हत असलेल्या तथाकथित आणि स्वयंघोषित महाभागांचे जीवनच व्यर्थ समजावे लागेल. निश्चितच ईश्वर इतिहासाची पुनरावृत्ती करून इतर राष्ट्र वा मानव समूहास या कार्यासाठी तयार करील.

(संदर्भ : तर्जुमानुल कुरआन (मासिक), माहे : शव्वाल, १३५९ हि. स.)

# प्रकरण सहावे

## शैक्षणिक चर्चासत्राचा वृत्तान्त

आपल्या या संघटनेस आपल्या शैक्षणिक विचारसणीवर आधारित विद्यालय आणि प्रशिक्षण केंद्राची गरज सुरुवातीपासूनच भासत असून या वर्तमान केंद्रात आल्यावर हे ठरविण्यातसुद्धा आले होते. परंतु विभिन्न सल्ले आणि तजविजी प्रयोगात आणण्याकडे लवकर पाऊल उचलण्यात येऊ शकले नाही. अत्ताच्याच काळात संघटनेची जी संमेलने बिहार, पंजाब, दिल्ली आणि दखनच्या भागात भरविण्यात आली, त्यात संघटनेच्या सदस्यांतर्फे या गोष्टीची जोरदार मागणी करण्यात आली की, आता या कार्यास उशीर होता कामा नये. याबरोबरच ही मागणीसुद्धा झाली, की संघटनेच्या केंद्राकडून हा निर्णयसुद्धा तत्काळ घेण्यात यावा जेणेकरून विद्यालय आणि प्रशिक्षणगृहाच्या स्थापनेमध्ये अस्थायी स्वरुपाचे केंद्र असावे. यासाठी संभावित बाधा येऊ नये आणि निश्चित होऊन एका ठिकाणी बसून निवांतपणे या कार्य तजवीजीस कार्यात्मक स्वरुप देण्यात यावे. म्हणून दखन भागाचा दौरा आटपून परत आल्यावर लागलीच यावर चर्चा करण्यासाठी एक छोटीशी समिती तयार करून १४, १५, १६ ऑगस्ट रोजी चर्चासत्र आयोजित करण्यात आले. हे सत्र आयोजित करण्यापूर्वी एकीकडे शैक्षणिक समस्यांवर आधारित प्रश्न संच 'कौसर' या वर्तमानपत्रात प्रकाशित करण्यात आला, जेणेकरून जे लोक या कार्यात रस घेतात, त्याबरोबरच ज्यांना शैक्षणिक समस्यांचा अभ्यास आहे, त्यांच्या सल्ल्यांचा आम्हास लाभ घेता येईल. दुसरीकडे संघटनेच्या आवश्यकता व गरजा स्पष्ट करीत असताना संघटनेचे सदस्य आणि शुभचिंतक व सहयोगीजणांना विनंती करण्यात आली, की संघटनेसाठी स्थायी स्वरुपात आवश्यक असलेल्या केंद्र उभारणीसाठी 'स्थान' निश्चितीचा सल्ला देण्यासाठी चर्चा सत्रापूर्वीच आपापल्या तजविजी पाठविण्यात याव्यात जेणेकरून या सर्वांच्या तजविजी आणि बहुमोल सल्ले चर्चेत घेऊन संघटनेच्या केंद्र स्थानाविषयी अंतीम निर्णय घेता येईल.

आमच्या या दोन्ही आवाहनावर शैक्षणिक योजना आणि केंद्रनिश्चिती संबंधी संघटनेच्या सदस्य व कार्यकर्त्यांचा चांगला प्रतिसाद मिळाला. या सदस्य व कार्यकर्त्यांचा सल्ल्यांतून आम्हास खूप लाभ झाला. ईश्वर या सर्वांना त्यांच्या सहयोग आणि प्रतिसादाचा भरपूर मोबदला प्रदान करो ! (आमीन)

१४ ऑगस्ट १९४४ इ. स. रोजी नियोजित वेळेवर 'दारुस्सलाम' या ठिकाणी या शैक्षणिक चर्चासत्राची सुरुवात झाली. या चर्चासत्रात निमंत्रण देण्यात आलेले सर्वजण उपस्थित होते. या उपस्थितांची संख्या ४२ होती.

## पहिली सभा

'दारुस्सलाम'च्या मज्सिदमध्ये दुपारच्या नमाजीनंतर या सभेचे उद्‌घाटन करताना संघटनेचे अध्यक्ष 'माननीय सय्यद अबुल आला मौदूदी' यांनी 'नवीन शिक्षण व्यवस्था' या विषयावर आपला निबंध सादर केला. हा निबंध 'तर्जुमानुल कुरआन' या मासिकातसुद्‌धा प्रकाशित झालेला आहे. या नंतर त्यांनी भाषणास सुरुवात केली.

''मी आत्ताच सादर केलेले निबंध तुम्ही ऐकलेच आहे, तरी सुद्‌धा यावर परत प्रकाश टाकण्याची मला यासाठी गरज भासत आहे, की हे निबंध आपल्या विचारसरणीवर आधारित असलेल्या शैक्षणिक योजनेचा पाया व आधारशिला आहे. यालाच आपणास मूर्तस्वरुप द्यावयाचे आहे. हे कार्य तडीस लावण्यासाठी आपल्या बुद्‌धीत मी सांगितलेले नियम आणि तत्त्वे संक्षिप्त स्वरुपात सुरक्षित असणे आवश्यक आहे. त्याच प्रमाणे आपण नियोजित केलेल्या योजनेसाठी मी कार्यात्मक स्वरुप अद्याप निश्चित करू शकत नाही. माझी जवाबदारी एवढीच आहे की, इस्लामी चळवळीस ज्या प्रकारची माणसे आवश्यक आहेत व त्यांच्यात जे गुणधर्म आणि पात्रता असलेले कार्यकर्ते आवश्यक आहेत, तो आराखड़ा मी सादर करावा. यानंतर या आपल्यापैकीच जे लोक या विषयात तज्ञ असतील, त्यांनी हे कार्य तडीस नेण्यासाठी योग्य नियोजन करावे.

तुम्हाला माहिती आहेच की, यावेळी आपल्या देशात ज्या ज्या प्रकारच्या शिक्षण पद्‌धती प्रचलित आहेत, त्यापैकी कोणतीच शिक्षण पद्‌धती आपणास आवश्यक असलेल्या स्वरुपाचे विद्यार्थी तयार करु शकत नाहीत. म्हणूनच आपल्याला आपली स्वत:ची शिक्षण व्यवस्था उभी करण्याची गरज भासत आहे. आपल्याला केवळ एवढे करुन भागणार नाही की, आपण आपली नवीन पिढी या शिक्षणाद्‌वारे आपला उद्देश व आपल्या विचारसरणीनुसार तयार करून मोकळे व्हावे. या पलीकड़चा आणि जास्त पुढ़चा विचार करुन त्यांच्यासाठी नैतिक आणि कार्यात्मक प्रशिक्षणाचाही बंदोबस्त करावा लागेल. तसेच ही आवश्यक असली वैशिष्ट्ये या कारणास्तवसुद्‌धा नितांत गरजेचे आहे, की आपल्या देशात बऱ्याच काळापासून नैतिक अधोगतीमुळे सामूहिक प्रशिक्षणाची व्यवस्था पार कोलमडून गेली आहे. जुन्या काळात सामूहिक व सामाजिक प्रशिक्षणाची जी पद्‌धत होती, ती आधुनिक काळातील राजकीय व सांस्कृतिक क्रांती व परिवर्तनाबरोबर संघर्ष करता करता अपयशी ठरली. हे झाल्यावर आधुनिक राजकीय आणि सांस्कृतिक क्रांती व परिवर्तनवाद्यांनी पर्यायी ठरणाऱ्या सामाजिक प्रशिक्षणाची कोणतीच व्यवस्था निर्माण केली नाही. याउलट सामान्य जनमाणसांना स्वेच्छेने कोठेही आणि कोणत्याही ठिकाणी सर्रास फोफावण्यासाठी सोडून देण्यात आले. परिणामी आपल्या देशात सुशिक्षितांची कमतरता तर आहेच, परंतु यापेक्षाही जास्त कमतरता प्रशिक्षितजणांची आहे. ही गोष्ट बहुतेकवेळा माझ्यामनास खूप त्रासदायक ठरली, आपल्या

समाजातील जुन्या शिक्षण पद्धतीत अथवा नवीन शिक्षण पद्धतीत उच्च शिक्षित माणूससुद्धा माणुसकी आणि नैतिकतेचे प्राथमिक धडेसुद्धा शिकलेला नसून खूप अज्ञानी दिसतो. त्याच्यात सुसंस्कृतता आणि शिस्तबद्धतेचा लवलेशही दिसत नाही. या कारणास्तव उच्च उद्देश आणि हेतु घेऊन उठणारी संघटना तयार होणे खूप कठीण असते. तुम्ही पाहिले असेल की ज्या मानवसमूहात अथवा राष्ट्रात सामूहिक प्रशिक्षण व्यवस्था पूर्णत: अस्तित्वात आहे, तेथील बरेच जण आणि बहुतेकजण सुशील, सुसंस्कृत आणि शिस्तबद्ध जीवन जगत आहेत. मग एखाद्या माणसाने जर एखादी विशेष चळवळ त्यांच्यात सुरु केली तर त्यास या प्रशिक्षित, सुशील आणि शिस्तबद्ध लोकांमध्ये केवळ आपल्या चळवळीनुसार गुणधर्म निर्माण करण्याचे प्रयत्न करणेच पुरेसे ठरते. परंतु आपल्याकडे ही मोठी अडचणच आहे, की मानवाचे मूलभूत प्रशिक्षणच झालेले नाही. येथे जर एखाद्या उद्दिष्टपूर्तीस्तव प्रयत्न करावयाचे असल्यास यासाठी तयार न झालेला असा कच्चा माल आणि कूचकामी व व्यर्थ असलेला माल मिळतो. त्यास अगदी सुरुवातीपासून तयार करण्याची गरज पडते. म्हणून आपणास आपल्या शिक्षण व्यवस्थेत बौद्धिक प्रशिक्षणापेक्षाही जास्त नैतिक प्रशिक्षणाकडे लक्ष देण्याची गरज आहे, जेणेकरून आपल्याला धर्मप्रसार कार्यासाठी खऱ्या आणि योग्य स्वरुपाचे कार्यकर्ते उपलब्ध होतील. हे उपलब्ध नसल्यानेच आपले हे कार्य अखंड प्रयत्न करूनही पुढे सरकत नाही.

या बाबतीत आणखीन एक गोष्ट लक्षणीय आहे, ती अशी की, आपण काही यावेळी एखादा देश चालविण्याचा अधिकार आपल्या हाती घेत नाही की ज्यासाठी आपल्याला आपला राज्यकारभार चालविण्यास पात्र असलेले लोक तयार करावे लागतील. आपल्यासमोर सध्या केवळ एकच कार्य महत्त्वाचे आहे, की जगामध्ये नैतिक, वैचारिक आणि सामाजिक क्रांती घडवून आणण्यासाठी योग्य नेते आणि कार्यकर्ते तयार करण्यात यावे. या कार्यपूर्तीसाठी वैद्यकीय, अभियांत्रिकी वा विज्ञानाच्या तज्ञांची मुळीच गरज नाही. आपल्याला केवळ अशा लोकांची गरज आहे. जे इस्लाम धर्म आणि समाजशास्त्राचा (Social Science) सखोल आणि संशोधनात्मक अभ्यास केलेले असतील. पुढे चालून जसे जसे आपले कार्य विस्तारित होत जाईल, तसे तसे विषयांत वाढ करण्यात येईल. सध्यातरी आपल्याला उच्च शिक्षणाचे पाच विभाग (Faculties) स्थापन करण्याची गरज आहे. याचे स्पष्टीकरण मी लागलीच आपल्यासमोर मांडणार आहे. याच शिक्षण शाखा दृष्टिसमोर ठेवून आपल्याला प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणाची व्यवस्था करावयाची आहे, जेणेकरून या पाच विभागासाठी विद्यार्थी तयार व्हावेत.

आता मी सर्वप्रथम आपल्यासमोर उच्च शिक्षणाचा दर्जा आणि प्रमाण सादर करीत आहे.

१) उच्च शिक्षणाचा प्रमाणित दर्जा

### अ) ज्ञानात्मक दर्जा

उच्च शिक्षणाचे पाच विभाग (Faculties) चे ज्ञानात्मक स्वरुप पाच प्रकारचे आहेत.

### १) तत्त्वज्ञान (Phylosophy)

तत्त्वज्ञानाचा (Phylosophy) चा इतिहास, तत्त्वज्ञ, मुस्लिम तत्वज्ञानाची विविध विद्यालये, मुस्लिमेतर तत्त्वज्ञानाचे विविध विद्यालये, कुरआनाचे ज्ञान, अध्यात्माचे तत्त्वज्ञान, युक्तिवाद, मानसशास्त्र, नैतिकतत्वज्ञान, वैचारिक (Theoritical) विज्ञान, कुरआनसंबंधी तत्त्वज्ञान आणि याच्या मदतीस्तव प्रेषित कथन.

### २) इतिहास (History)

इस्लामचा इतिहास, मुस्लिमांचा इतिहास, जगाचा इतिहास (आधुनिक व प्राचीन), क्रांती व परिवर्तनाचा इतिहास, इतिहासाचे तत्त्वज्ञान, समाजशास्त्र (Sociology), विविध सामाजिक तत्त्वज्ञान, नागरिकशास्त्र (Civics), राज्यशास्त्र, जगाचे विधान (Constitution of the World), इतिहासाचे इस्लामी तत्त्वज्ञान आणि संस्कृतीचे तत्त्वज्ञान व सामूहिक व राजकीय व्यवस्थेचा अभ्यास (दिव्य कुरआन व हदीस (प्रेषित कथन) च्या मार्गानुसार.

### ३) अर्थशास्त्र

अर्थशास्त्र, विभिन्न आर्थिक सिद्धान्त आणि सांस्कृतिक पंथ, जगातील विभिन्न आर्थिक व्यवस्था, वित्त (Finance), बैंकिंग (Banking), कुरआन व प्रेषित कथन आणि इस्लामी विधीशास्त्रानुसार असलेला आर्थिक दृष्टिकोन.

### ४) कायदा (Law)

कायद्याचा इतिहास, कायद्याचे नियम, प्राचिन जनसमूहाचे आणि आधुनिक जनसमूहाचे कायदे, न्याय तत्वे आणि न्याय व्यवस्था, कुरआन व प्रेषित कथन आणि इस्लामी विधीशास्त्राचा कायद्यात्मक अभ्यास

### ५) इस्लामी विद्याशास्त्र

साहित्य आणि अरबी शब्द शास्त्र, कुरआनचे वर्णन, प्रेषित कथन, इस्लामी-विधीशास्त्र, इस्लामचा इतिहास, मुस्लिम विचारसरणींचा इतिहास, जगातील धर्मांचा तुलणात्मक अभ्यास, जगातील विभिन्न धर्मांचा इतिहास, धर्माचे तत्त्वज्ञान, आधुनिक काळातील धार्मिक व नैतिक चळवळी, पाश्चात्य धर्मभ्रष्टतेचा इतिहास.

## ब) बौद्धिक आणि नैतिक दर्जा

या ज्ञानात्मक दर्जाचे शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांत आपण निम्नलिखित गुणधर्म निर्माण करु.

१) विचार, दृष्टिकोन आणि बौद्धिक व स्वभावानुसार तो पूर्णत: मुस्लिम असावा इस्लामसाठी संपूर्ण जगाशी लढ्ण्याची तयारी असावी.

२) धर्मामध्ये वैधानिक आणि साकल्यपूर्ण दृष्टि व नजर ठेवणारा असावा. तसेच या जगात बिघडलेल्या जीवनव्यवस्था, अनैतिकता वगैरेंना नष्ट करून नैतिकतेवर आधारित जीवनव्यवस्था निर्माण करण्यासाठी आवश्यक असलेले बळ आणि प्रचंड इच्छाशक्ती त्याच्यात निर्माण व्हावी.

३) त्यांचे बौद्धिक प्रशिक्षण एवढे कमाल दर्जाचे व्हावे, की समस्त ज्ञानजगतावर त्यांच्या राज्याचा असामान्य परिणाम व्हावा.

४) ते अशा संपूर्ण गुणधर्मांपासून मुक्त असावे जे गुणधर्म कुरआन आणि प्रेषित- कथनांमध्ये कुफ्फार (ईशद्रोही), फुस्साक़ (अपराधी वृत्तीचे) आणि दांभिकांचे गुणधर्म ठरविण्यात आले आहेत. तसेच ज्या वाईट गुणधर्मांना इस्लामी श्रद्धेविरुद्ध, इस्लामविरुद्‌ध आणि सज्जनशील समाजासाठी घातक ठरविण्यात आले आहेत. या उलट त्यामध्ये वैयक्तिकरीत्या आणि सामूहिकरीत्या अशी नैतिक धारणा व नैतिक गुणधर्म निर्माण व्हावे, ज्यां गुणधर्मांना दिव्य कुरआन आणि प्रेषित कथनांमध्ये ईशभक्त, ईशपरायण, सच्चे, सज्जन परोपकारी आणि यशवंत यासारख्या संबोधनांनी आणि गुणधर्मांनी सन्मानित करण्यात आले आहे.

५) त्यांना या जगामध्ये स्वबळावर उभे राहता आले पाहिजे. त्यांना प्रत्येक क्षेत्र गाजविता यावे. ते कोणत्याही मार्गात कमी पड़ता कामा नये. प्रत्येक संकटाचा निर्भयपणे सामना करण्याचे अफाट साहस आणि असामान्य शक्ती त्यांच्यात असावी. तसेच जमिनीची छाती फोडून प्रत्येक ठिकाणावरून आपली उपजीविका काढ्ण्याची पात्रता त्यांच्यात निर्माण व्हावी.

ही आहे सर्वात वरची आणि अंतिम (Super Structure) मजल. ही मजल आपल्याला मारायची आहे. हाच पल्ला आपल्याला गाठायचा आहे. यासाठी आपल्याला माध्यमिक शिक्षणाची व्यवस्था करावी लागणार आहे. यामध्ये आपोआप निम्नोलेखित विभागांची (Faculties) तयारी करणे आवश्यक आहे.

## २) माध्यमिक शिक्षणाचा प्रमाणित दर्जा

## अ) सामान्य दर्जा

माध्यमिक शिक्षणाच्या सामान्य दर्जाचे तीन विभाग (Faculties) आहेत.

१) अरबी भाषा, इंग्रजी अथवा इतर यूरोपीय भाषा यामध्ये संशोधनात्मक विषयाचा अभ्यासापुरत्या भाषा आत्मसात व्हाव्यात.

२) कुरआनच्या संशोधनात्मक अभ्यासाची प्राथमिक तयारी.

३) प्रेषित कथनांच्या अभ्यासाची तत्त्वे आणि प्रेषित कथनांवर आधारित एखाद्या छोट्याशा पुस्तकाचा संशोधनात्मक अभ्यास. यावरून विद्यार्थ्यांकरिता पुढील संशोधनात्मक अभ्यासाचे मार्ग खुले व्हावे.

## ब) विशेष विभाग

माध्यमिक शिक्षण विभाग अथवा दर्जाचे पाच विभाग आहेत. हे पाच विभाग (Faculties) उच्च शिक्षणाकरिता निवडण्यात आले असून प्रत्येक विशेष विभागात या विषयांचे मूळ नियम आणि सहाय्यक व पूरक ज्ञानावर आधारित विषय यावेत. अर्थातच यांचा उच्चशिक्षणातही विद्यार्थ्यांना अभ्यास करावयाचा आहे. उदाहरणार्थ :

१) तत्त्वज्ञानाकरिता युक्तिवादाचे मूळ नियम, आधुनिक आणि प्राचीन तत्त्वज्ञान तसेच कुरआन विद्यावर आधारित एक-एक पुस्तक, ज्यामध्ये या ज्ञानाचे पारिभाषिक शब्द, भाषाशैली आणि मूलभूत नियमांच्या माहितीसाठी पुरेसे ठरावे. याबरोबरच मानसशास्त्र, भौतिकशास्त्र आणि रसायनशास्त्रावर आधारित प्रत्येकी एक पुस्तक असावे.

२) इतिहास विभागाकरिता समाजशास्त्र (Social Science), राज्यशास्त्र (Political Science) चा असा अभ्यासक्रम की ज्यामध्ये विद्यार्थ्यांना ऐतिहासिक संशोधन आणि संस्कृती व त्याशी संबंधित विद्या व ज्ञानाची माहिती विद्यार्थ्यांना व्हावी.

३) अर्थशास्त्र विभागासाठी असलेल्या अभ्यासक्रमात विद्यार्थ्यांनी मानव समाजाच्या रचनेचे (Structure) ज्ञान आणि तिच्या एकूण मौलिक नियमांना समजून घ्यावे. यानंतर अर्थशास्त्र, वित्त व वाणिज्य, बँकिंग आणि आर्थिक व्यवहाराच्या नियमांचा अभ्यास व्हावा. याव्यतिरिक्त वर्तमान काळातील आर्थिक व्यवस्था आणि यासंबंधी विषयाचा एकूणरीत्या अभ्यास व्हावा.

४) कायदा विभागासाठी कायद्याचे नियम, इस्लामी विधीशास्त्राचे नियम, कायद्याचा इतिहास आणि इस्लामी विधीशास्त्राचा इतिहास या विषयांवर प्रत्येकी एक प्राथमिक स्वरुपाचे पुस्तक असावे.

५) इस्लामी शास्त्र विभागासाठी एक अभ्यासक्रम असावा. या सामान्य अभ्यासक्रमाव्यतिरिक्त 'अरबी भाषा' हा विषय असावा. शिवाय इस्लामी विधीशास्त्र आणि याच्या इतिहासावर प्रत्येकी एक पुस्तक तसेच विभिन्न धर्माच्या तुलनात्मक अभ्यासावर एक पुस्तक असावे. यात 'धर्मांचा इतिहास' यावरसुद्‌धा एक पुस्तक असावे.

या दोन्ही वरच्या मजलांना सांभाळण्यासाठी तुम्हास या इमारतीच्या निर्मितीची सुरुवात खालच्या मजल्याने करावी लागणार. हा खालचा आणि पहिला मजला अत्यंत मजबूत

करण्यासाठी तुम्हाला खूप खोलवर विचार करावा लागणार आहे, म्हणजे या शैक्षणिक इमारतीचा पाया खूप मजबूत असावा आणि विद्यार्थ्यात ज्ञानात्मक व नैतिक दोन्ही प्रकारे आवश्यक असलेल्या पात्रता आणि गुणधर्म निर्माण करणे आवश्यक आहे. सज्जन समाजनिर्मिती आणि आपल्या संघटनेस आवश्यक असलेल्या कार्यकत्यांच्या निर्मितीसाठी हे आवश्यक आहे. या पर्वावर आपण ही गोष्ट पण ध्यानात ठेवावी की जे विद्यार्थी प्राथमिक दर्जातून पुढे जाण्यासाठी पात्र ठरणार नाहीत त्यांना मौलिक शिक्षण प्रशिक्षणातून प्रकारे तयार करावे लागेल. मानवता आणि इस्लामवादी गुणधर्मांपासून वंचित राहता कामा नये. तसेच सभ्य आणि सुसंस्कृत जीवनाचे गतिशील घटक बनण्यासाठी आवश्यक असलेली पात्रता आणि लायकी त्यांच्यात निर्माण व्हावा. या कामासाठी तुम्ही योग्य तेवढी मुदत ठरवावी आणि ही मुदत योग्य प्रमाणात विभागण्यात यावी. कारण शिक्षणतज्ञ असण्याकारणाने हे काम व जवाबदारी तुमचीच आहे. मी केवळ एवढेच सांगू शकतो की, प्राथमिक शिक्षणाच्या पूर्णत्वावर आपण आपल्या विद्यार्थ्यांत कोणत्या प्रकारची पात्रता आणि गुणधर्म निर्माण करु इच्छितो.

## ३) प्राथमिक शिक्षणाचा प्रमाणित दर्जा

### अ) नैतिक दर्जा

१) नीटनेटकेपणा, स्वच्छता व पावित्र्य, विवेक

२) वैयक्तिक, सामूहिक नैतिकता

३) शिस्त (Discipline), सुसंस्कृतपणे समाजात राहण्याची व काम करण्याची वर्तणूक, आत्मपरीक्षणाची सवय, कर्तव्याची जाण, जवाबदारीची जाणीव

४) औदार्य, विस्तृत दृष्टी, विस्तिर्ण कल्पना, साहस, स्वाभिमान

५) पक्का निश्चय, गांभीर्य (Seriousness), प्रामाणिकता आणि असा गुणधर्म की ज्या बाबीत रस आणि छंद असेल, त्यात दांभिकता नसावी.

६) धाडस व पराक्रम, त्याग, स्फूर्ती, प्रत्येक प्रकारचे काम करून घेण्याची पात्रता, जीवनाची सर्वांगीन बौद्धिक व कार्यात्मक माहिती.

७) इस्लामच्या उद्दिष्टाप्रती निष्ठा आणि इस्लामची प्रखर भावना की जी आत्मा व अंत:करणात खोलवर रुजलेली असावी आणि जिचे दर्शन विद्यार्थ्यांच्या संपूर्ण हालचालीद्वारे होत असेल.

८) इस्लामी मापदंडानुसार (Islami Standard of Living) प्रत्येक वस्तुचे मोजमाप करण्याची सवय.

९) कुरआन आणि प्रेषित कथनातून स्पष्ट झालेले जीवनाचे गुणधर्म

१०) आवश्यक असलेले नियोजन कौशल्य

११) संशोधन आणि जिज्ञासा व विचार करण्याची व निरीक्षण करण्याची सवय उघड्या कानांनी व उघड्या डोळ्यांनी जगात राहणे, प्रत्यक्षात विचार करणे आणि परखून निवड करणे.

## ब) शारीरिक दर्जा

१) कुस्ती खेळणे पोहणे, तलवार चालविणे, घोडेस्वारी, सायकल चालविणे, बंदूक चालविणे वगैरे.

२) खोरे-कुदळ, हातोडे, करवत आणि अशा प्रकारच्या साधनांचा कामात उपयोग करता यावा. प्रथमोपचाराची माहिती व्हावी.

३) बाजारातून सामान खरेदी करून आपला माल विकण्याची लायकी निर्माण व्हावी.

४) विद्यार्थी वस्तिगृहाची व्यवस्था, एखाद्या महासंमेलनाची तयारी आणि एखाद्या मोठ्या पार्टीची तयारी करण्याची पात्रता निर्माण व्हावी.

५) कार्यालयीन कामकाजाची माहिती, व्यापारी पत्र व्यवहाराचा सराव.

६) भाषण कौशल्य, लिखाण कौशल्य, धर्मप्रचार व प्रसार, संवाद कौशल्य आणि चर्चा वगैरेत प्राविण्य.

७) काही थोडे फार स्वयंपाक करता येणे, कापड कापणे, शिवणे वगैरे.

## क) ज्ञानात्मक दर्जा

१) उर्दू भाषेचे ज्ञान, उर्दू साहित्य वाचन आणि आकलन करण्याची पात्रता, आपले विचार लेखी स्वरुपात मांडण्याचे आणि तोंडी बोलण्याचे तंत्र अवगत व्हावे.

२) कुरआन समजण्यासाठी प्राथमिक दर्जाची अरबी भाषा येणे.

३) फारसी (पर्शियन) भाषा येणे.

४) प्राथमिक दर्जाची इंग्रजी भाषा येणे. इंग्रजी पुस्तकांचा अभ्यास करता येणे आणि भाषांतर करता येणे. सामान्य माहितीकरिता विद्यार्थी उर्दू भाषा अवगत करेल.

५) बौद्धिक प्रशिक्षणास्तव आणि आपल्या माध्यमिक आणि उच्च शिक्षणास्तव आवश्यकतेनुसार गणित व संख्याशास्त्र शिकविण्यात यावे.

६) भूगोल, भौतिकशास्त्र, हिंदी विषय शिकविण्यात यावे.

७) इस्लाम व मुस्लिमांचा इतिहास, प्रेषित सोबत्यांचा व मुस्लिम पूर्वजांचा इतिहास तसेच भारताचा संक्षिप्त इतिहास.

८) इस्लामी श्रद्धाशास्त्र, इस्लामी नीतीमत्ता आणि इस्लामी संस्कृती व सभ्यताबाबतीत स्पष्ट कल्पना, इस्लामी विधीशास्त्राची एका मुस्लिमास आवश्यक असलेली माहिती.

९) सार्वजनिक आरोग्य आणि शरीरशास्त्र (Physiology), भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, आपले शरीर, आपले समाज आणि वातावरणाचा अभ्यास.

१०) चित्र रेखाटन (Drawing), मॉडेल स्केच ड्राईंग, मुक्त हस्त चित्र, पेंटिंग आणि टापटिप व नीटनेटकेपणा, नकाशा रेखाटन (Map drawing) कौशल्य.

## ४) माध्यमिक आणि उच्चशिक्षणाची अस्थायी व्यवस्था

मूळ शिक्षण व्यवस्थेसंबंधी असलेल्या आवश्यक बाबींचा मी उल्लेख केला आहे. आता आणखीन एका आवश्यक बाबींकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. हे बरोबर आहे की, केवळ एवढ्यामुळे आपल्या संघटनेची गरज पूर्ण होणार नाही, याची मला पूर्णतः जाणीव आहे. यासाठी पाच विभागांवर आधारित उच्चशिक्षणाशिवाय गत्यंतर नाही. हेसुद्धा स्पष्ट आहे की, या उच्चशिक्षणाचा पल्ला गाठण्यासाठी बराच काळ लागणार आहे. परंतु आपल्याला सध्याच्या गरजापूर्ण करण्याची खूप आवश्यकता आहे. आपण उच्च शिक्षणाच्या पूर्ततेची वाट जास्त वेळ पाहू शकत नाही. म्हणून या माध्यमिक आणि उच्च शिक्षणासाठी आपल्याला तत्काळ व्यवस्था करावी लागणार आहे. मग ती अस्थायी स्वरुपाची का असेना. यामुळे महाविद्यालयात आणि अरबी शाळेत शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांवर आपण कौशल्य लावून त्यांना इस्लामी आणि नैतिक प्रशिक्षण देवून बौद्धिक आणि नैतिक स्वरुपात तयार करू. याचे दोन फायदे होतील. पहिला फायदा असा की, या वेळी ज्या उच्चप्रतीच्या कार्यकर्त्यांची आणि नेत्यांची गरज आहे, ते उपलब्ध होतील. दुसरा फायदा असा की, या अस्थायी स्वरुपाच्या व्यवस्थेमुळे जे लोक तयार होतील, तेच आपल्या माध्यमिक आणि उच्चशिक्षण विभागात शिक्षण देतील आणि अभ्यासक्रमाच्या पुस्तकांची निर्मिती करतील. पुढे चालून आपण या अस्थायी व्यवस्थेत थोड्याशा परिवर्तनासह उच्च शिक्षणाच्या विभागात परिवर्तन करुया, जेणेकरून या प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणाच्या पर्वांतून न जाता हे पर्व दुसऱ्या विद्यालयांतून ठरवून यावे आणि त्यांना आपणास आपल्या उच्चशिक्षणात समाविष्ट करता येईल.

या अस्थायी व्यवस्थेसाठी शिक्षणाची मुदत आणि पल्ले निश्चित करण्याची जवाबदारी तुमची आहे. मी केवळ शिक्षणाचा दर्जा निश्चित केलेला आहे.

## ५) शिक्षणाचा अपेक्षित दर्जा

१) जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात ईशग्रंथ (कुरआन) आणि प्रेषितचरित्रानुसार मार्गदर्शन मिळण्याइतपत संशोधनात्मक दृष्टी विद्यार्थ्यांना प्राप्त व्हावी.

२) इस्लामी विधीशास्त्राचे ज्ञान असावे.

३) प्राचीन बुद्धिवादाचे इतके ज्ञान असावे की, प्राचिन बुद्धिवादाचा अभ्यास करून वर्तमान काळातील ज्ञानात्मक आणि बौद्धिक पार्श्वभूमी विद्यार्थ्यास कळावी.

४) वर्तमान काळातील सांस्कृतिक व सामाजिक समस्या कळण्याइतपत तसेच वर्तमान काळातील समाज चळवळीवर समीक्षणात्मक दृष्टि ठेवण्याइतपत साकल्यशक्ती विद्यार्थ्यांत निर्माण व्हावी.

५) विद्यार्थ्यांमध्ये जागतिक इतिहासावर संक्षिप्त अभ्यास, 'खिलाफते राशिदा' (इस्लामी शासनकाळ) च्या इतिहासाचा अभ्यास, भारत आणि यूरोपच्या आधुनिक इतिहासाचा अभ्यास असावा. आता मी आपणास विनंती करतो की, आपण आपले कार्य ईश्वराचे नाव घेऊन सुरु करावे, ईशदरबारी प्रार्थना आहे की, तो आपणास योग्य मार्गदर्शन करील. (आमीन)''

(या भाषणानंतर प्रश्न संचातील प्रश्नांची उत्तरे देणाऱ्या उपस्थितांनी आपापली उत्तरे सादर केली, जेणेकरून अध्यक्ष महोदय 'मौलाना सय्यद अबुल आला मौदूदी' यांनी या उत्तरात काही वाढ अथवा कमी करून योग्य अभिप्राय द्यावा आणि दुसऱ्या दिवशी ह्या भाषणानुसार योग्य ती सुधारणा करून चिंतन करण्यात यावे. आता 'असर' (तिसरा प्रहर) च्या नमाजची वेळ झाली होती. असरची नमाज संपल्यावर सभा सपन्न झाली आणि उपस्थितजण टोळीटोळीने बसून आपापल्या कामात व्यस्त होते.)

## दुसरी सभा

दुसऱ्या दिवशी सकाळी नऊ वाजता संमेलनाच्या दुसऱ्या सभेस प्रारंभ झाला. हे संमेलन दुपारी छोट्याशा मध्यांतरासह संध्याकाळ पर्यंत सुरु होते. प्रश्नांच्या संपूर्ण उत्तरपत्रिका उपस्थितांमध्ये वाटप करण्यात आल्या. प्रश्नावलीतील प्रश्नाच्या प्रत्येक उत्तरावर एक एक करून चर्चा होत गेली. अध्यक्ष महोदय एक प्रश्न विचारीत असत आणि याची विभिन्न उत्तरे वाचण्यात येत होती. मग यावर गांभीर्याने चिंतन मनन आणि चर्चा होत होती. अध्यक्षांनी घेतलेला अंतिम निर्णय लिहिला जात होता. या वेळी ज्या बाबींविषयी निर्णय घेण्यात आले त्यांचा येथे उल्लेख होत आहे.

### ६) शिक्षण समितीचा ठराव

अ) शिक्षणाच्या सत्रांची एकूण मुदत

१) एकूण शिक्षणाची मुदत चौदा वर्षांची असेल. ही मुदत निम्नलिखित कालखंडात विभागण्यात येत आहे.

अ) प्राथमिक शिक्षण पर्व - आठ वर्षे

ब) माध्यमिक शिक्षण पर्व - दोन वर्षे

क) उच्च शिक्षण पर्व - चार वर्षे

## अ) प्राथमिक शिक्षण पर्व

२) केवळ प्राथमिक शिक्षणास्तव विद्यालय सध्या स्थापन करण्यात यावे. याचे प्रमुख (Incharge) 'ग़ाझी अब्दुलजब्बार साहेब (M.A., B.T.) असतील.

३) या विद्यालयातील पहिल्या वर्गात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांचे वय सहा ते आठ वर्षे आहे.

### नोट

मधल्या वर्गात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना परीक्षणार्थ एका ठराविक मुदतीपर्यंत (ही मुदत कमाल तीन महिन्यांची असेल) विशेष वर्गात (Special class) ठेवण्यात येईल. एका समवयीन विद्यार्थ्यांस त्याचा सहयोगी मित्र बनविण्यात येईल जो त्यास संघटन केंद्राच्या विविध विभागांचा परिचय करून देईल. या सहयोगी मित्राची काळजी वाहण्यासाठी काळजीवाहूंची नियुक्ती करण्यात येईल. हे काळजीवाहू याकरिता प्रयत्नशील असतील की, सहयोगी मित्र लवकरातलवकर केंद्राच्या जीवनप्रणालीशी समरुप व्हावा.

४) हे विद्यालय अनिवार्यरीत्या वस्तिगृह स्वरुपाचे (Residential) असेल.

५) विद्यार्थ्यांच्या शिक्षण आणि पालकत्वाचा खर्च विद्यार्थ्यांच्या पालकांवर असेल.

६) या शाळेत केवळ त्याच्याच मुलांना प्रवेश मिळेल की, जे 'संघटनेच्या उद्दिष्टावर' सहमत आहेत. शिवाय शाळेत मुलांना दाखल करतेवेळेस त्यांनी लेखी वचनपत्र दाखल करावे की, 'ते आपल्या मुलांना कोणत्याही स्वरुपाच्या इस्लामेतर व्यवस्थेच्या कार्यकर्ते तयार करीत नसून केवळ इस्लामी उद्दिष्टपूर्तीसाठी दाखल करीत आहेत.'

७) प्राथमिक अवस्थेत विद्यार्थ्यांना कोणत्याही विशेष व्यवसायाकरिता तयार करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही, मात्र आपण हे प्रयत्न करु या की, आपल्या कार्यात्मक आणि नैतिक प्रशिक्षणाद्वारे मुलांमध्ये सर्वांगीन नैसर्गिक पात्रता व शक्ती कमीतकमी एवढ्या प्रमाणात निर्माण व्हाव्यात तसेच त्यांना एवढातरी अनुभव यावा की, आठ वर्षांच्या शिक्षण आणि प्रशिक्षणानंतर त्यांच्या अंगी एवढी शक्ती आणि बळ निर्माण व्हावे व याची त्यांना पण जाणीव व्हावी की, ईश्वाराच्या या भूमी विश्वात सगळीकडे त्यांना काम करून रोजगार मिळविण्याच्या संधी उपलब्ध असून त्या संधीचा आपण पुरेपूर लाभ घेऊ शकतो. आपल्या विद्यालयातून शिक्षण प्राप्त करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या आर्थिक समस्येचे हेच एक समाधान आहे.

८) अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तक निर्मितीचे कार्य पूर्ण करणाऱ्या समितीत हे पाच जण असतील. १) ग़ाझी अब्दुल जब्बार साहेब, २) मौलाना अमीन अहसन इस्लामी साहेब, ३) क़ाझी हमीदुल्लाह साहेब (सियालकोट), ४) नईम सिद्दीक़ी साहेब आणि ५) ख्वाजा मुहम्मद सिद्दीक साहेब (दिल्ली) ग़ाझी अ. जब्बार साहेब हे या समितीचे प्रमुख असतील. या शिवाय ज्या लोकांना या कार्यात सहकार्य करण्याची इच्छा असेल, त्यांनाही या शुभकार्यात सामील होता येईल.

## नोट

जी उत्तरे आमच्या प्रश्नावलीच्या उत्तरांदाखल प्राप्त झाली, तसेच जो मजकूर अभ्यासक्रमांसंबंधी प्राप्त झाला, तो आम्ही समितीच्या स्वाधीन करीत आहोत.

९) विद्यालयाच्या व्यवस्थापनसंबंधी बाबी, शिक्षकांची निवड, शिक्षकांची तयारी, वस्तिगृह आणि शाळेची शिस्त व व्यवस्थापन, इमारतींचे बांधकाम आणि इतर व्यवस्थांच्या कामाचा आराखडा तयार करण्यासाठी नेमलेल्या समितीच्या सदस्यांची नावे खालीलप्रमाणे आहेत. १) स. अबुल आला मौदूदी, २) मौ. आमीन अहसन इस्लाही, ३) ग़ाझी अ. जब्बार साहेब, ४) चौधरी मुहम्मद अकबर साहेब (सियालकोट)

१०) या ठरावात 'माध्यमिक आणि उच्च शिक्षणाच्या अस्थायी व्यवस्थेचा' ठराव मांडण्यांत येत आहे. यासाठी वेगळे विद्यालय स्थापन करण्यात यावे. या कार्याचे प्रमुख मौ. अमीन अहसन इस्लाही असतील.

११) या शिक्षणाचा कालखंड सहा वर्षांचा असेल. अर्थात दोन वर्षे माध्यमिक शिक्षणासाठी आणि चार वर्षे शिक्षण पूर्णत्वासाठी.

## नोट

अरबी विद्यालयातून पदवी घेतलेल्यांकरिता आणि अलीगढ विद्यापीठातील पदवीधरांकरिता ही सवलत चांगली आहे की त्यांनी कमी मुदतीत येथील शिक्षणाचा लाभ घ्यावा.

१२) माध्यमिक शिक्षण कालखंडाच्या सुरुवातीच्या पर्वामध्ये दाखल होणारे लोक वा विद्यार्थी कमीतकमी मॅट्रीक्युलेट (Matriculate) असावेत अथवा एखाद्या अरबी शाळेतील प्रमाणपत्रधारक अथवा समकक्ष असावेत.

१३) शाळेमध्ये प्रवेश घेण्यासाठी मुलाखतीमध्ये उमेदवाराची पात्रता तपासून घेण्यात येईल.

१४) केवळ अशाच उमेदवारास प्रवेश देण्यात येईल जे 'जमाअत-ए-इस्लामी' च्या विचारसरणीशी आणि तिच्या उद्दिष्टाशी सहमत आहेत.

१५) विद्यार्थ्यांना आपापली कामे स्वत:च करावी लागतील.

१६) या शाळेच्या अभ्यासक्रम, पाठ्यपुस्तक आणि एकूण व्यवस्थापना संबंधीच्या बाबींचा तपशील संपादित करण्यासाठी चार सदस्यीय समितीची स्थापना करण्यात येत आहेत. त्या सदस्यांची नावे याप्रमाणे -

१) मौ. अमीन अहसन इस्लाही साहेब, २) मौ. अख़्तर अहसन इस्लाही साहेब, ३) मौ. मसऊद आलम नदवी साहेब आणि ४) मौ. अबुलैस इस्लाही साहेब

## नोट

मौ. अमीन अहसन इस्लाही साहेब या समितीचे प्रमुख असतील. ते चार महिन्यांच्या आत आपल्या कार्याची तजवीज सादर करतील.

संमेलनाच्या समाप्तीपूर्वी 'आझम हाशमी साहेब' यांनी विनंती केली की, भारतामध्ये रशिया आणि तुर्किस्थानातून देशाबाहेर काढलेल्या लोकांच्या मुलांसाठी विशेष व्यवस्था करण्याची संधी निर्माण करण्यात यावी, जेणेकरून त्यांना एकीकडे उर्दू भाषा शिकता यावी आणि आपला अभ्यासक्रम सुरळीतपणे त्यांच्या लक्षात यावा. दुसरीकडे त्यांना तुर्की भाषा शिकण्याची संधीसुद्‌धा मिळावी. यावर संघटनेच्या अध्यक्ष महोदयांनी निर्णय दिला की, जर कमीत कमी वीस विद्यार्थी यासाठी स्थलांतरीतांचे मिळाले तर त्यांच्यासाठी विशेष व्यवस्था करता येईल.

## ७) या शिक्षणकार्यातील प्रमुख समस्या

विद्यालय स्थापनास्तव व्यवस्थापकीय बाबीं आणि अभ्यासक्रम निश्चिती व रचनेसाठी विविध समित्या स्थापन झाल्यानंतर आता या कार्यपूर्तीसाठी जास्त वेळ लागणार नाही, अशी अपेक्षा होती. परंतु काही समस्यांमुळे या कामांत दिरंगाई होत गेली. 'मियां तुफैल मुहम्मद' (महासचिव जमाअत-ए-इस्लामी हिंद) यांनी संघटनेच्या कार्याचा वृत्तान्त 'एप्रिल १९४५ मध्ये सादर केला, तो आम्ही जशास तसा आपल्यासमोर ठेवीत आहोत.

''हे सर्वांना ज्ञात आहे की शाळेकरिता पक्की इमारत नसली तरी विस्तीर्ण खोल्यांची गरज आहे. तसेच शाळेच्या इमारतीच्या सोयीपूर्वी शिक्षकांचे क्वार्टर्स आवश्यक आहेत, जेणेकरून त्यांनी विद्यालयाजवळच आपल्या कार्याची तयारी करावी. आपल्याकडे जी निवासस्थाने उपलब्ध आहेत, ती आपल्या कार्यकर्त्यांनाही पुरेशी नाहीत. आणखीन बांधकामासाठी येणाऱ्या अडचणी खालीलप्रमाणे आहेत.

१) हे गृहनिर्मिती कार्य सांभाळण्यासाठी आपल्याला एखादी योग्य व्यक्ती उपलब्ध होत नाही. ही व्यक्ती बांधकामात तज्ञ असावी आणि आपल्या संघटनेशी संबंधित असावी.

२) इमारत निर्मितीसाठी बांधकाम साहित्य आणि मटेरियलचा महागाईमुळे प्रचंड अभाव आहे. आमचा सुरुवातीस विचार होता, की पक्क्या इमारतीऐवजी छप्परांच्या काही खोल्या तयार करून कार्य सुरु करण्यात यावे. परंतु वर्तमान शासनाने (इंग्रज शासनाने) यात बाधा आणली.

३) शिवाय या कार्यास्तव लागणारा निधी उपलब्ध नाही. कारण आपल्या संघटनेत बरेचजण आर्थिक दुर्बल आणि गरीब आहेत. यासाठी इतर जणांप्रमाणे आम्ही लोकांना निधी देण्यासाठी कोणतेच आवाहन करणार नाहीत. निधी स्वीकारण्यापूर्वी आम्ही त्याची मानसिकता तपासून

पाहणार आहोत. निधीदाता जर निधी देण्याऐवजी स्वत:लाच समर्पण करीत असेल तर ते उत्तम. कारण जो माणूस केवळ मानवसेवा आणि सत्यसेवेकरिता निधी देईल, त्याच निधीवर हे कार्य आम्ही करणार. याचा असा परिणाम होईल की, या निधीवर शिक्षण घेऊन निघालेले विद्यार्थी सत्याधिष्ठ आणि सत्यावर प्राणार्पण करणारे असतील. एकेश्वरवादी असतील. या बाबतीत आमची कार्यप्रणाली अशी आहे, की आम्ही आपल्या गरजा संघटनेचे सदस्य आणि कार्यकर्त्यांसमोर ठेवतो. यानंतर प्रत्येकजण आपल्या श्रद्धा आणि निष्ठेनुसार मागणी पूर्ण करतो. तरीपण या ठिकाणी निधीचा अभाव असला तरी मला पूर्ण विश्वास आहे की, जर एखादी योग्य व्यक्ती आम्हास उपलब्ध झाली की, हे कार्य अवश्य पूर्ण होईल.''

मौ. अमीन अहसन इस्लाही साहेब या संमेलनापूर्वीच 'दारुस्सलाम' पठानकोट येथे पोहोचले होते. या संमेलनाच्या नंतर 'ग़ाझी अब्दुल जब्बार साहेबांना' अभ्यासक्रमाच्या कामासाठी केंद्रावर बोलावण्यात आले होते. ग़ाझी साहेबांनी केंद्रावर पोहोचल्यावर याची तयारी सुरु केली. परंतु विद्यालय स्थापनाच्या मार्गातील अड़चणी दूर झाल्या नाहीत. म्हणून 'मियां तुफैल मुहम्मद' साहेबांनी परत म्हणेल १९४६ इ. सनात याकरिता वृत्तान्त सभा बोलावली. यात त्यांनी म्हटले,

''मागील वर्षी विद्यालय स्थापनेच्या कार्यात मी ज्या समस्यांचा उल्लेख केला, त्यांपैकी एकही समस्या अथवा अड़चण दूर झाली नाही. आठ-नऊ महिन्यांच्या अखंड प्रयत्नांनी आम्ही केवळ दोन क्वार्टर्सची निर्मिती करु शकलो. हे क्वार्टर्स केवळ आपल्या वर्तमान व्यवस्थापकांसाठीच पुरेसे आहेत. म्हणून सध्यातरी मी शाळेच्या इमारतीबाबत पुरेसे स्पष्टीकरण देऊ शकत नाही की, हे काम पूर्ण होण्यासाठी आणखीन किती वेळ लागेल. हे कार्य संघटनेचे सदस्य आणि कार्यकर्त्यांच्या कष्टांवर आणि त्यागावरच आधारित आहे. याला आणखीन किमान एक वर्ष लागण्याची शक्यता आहे.''(मियां तुफैल मुहम्मद)

आणखीन एक वर्षाचा काळ लोटला. इ.स. १९४७ मध्ये बिहारमध्ये उसळलेल्या दंगलीनंतर 'ग़ाझी साहेब' हे 'जमाअत-ए-इस्लामी' च्या प्रशिक्षकपदी नियुक्त होऊन जेव्हा 'पाटना' शहरी पोहोचले, तेव्हा त्यांनी खूप विचार करून निर्णय दिला की, प्राथमिक विद्यालय हे बिहारच्या मानभवन जिल्ह्यातील 'कमरडबी' या गावी स्थापन करण्यात यावे. यानंतर बांधकामाच्या आवश्यक वस्तुंचा पुरवठाही झाला, परंतु या काळात भारताची फाळणी झाली आणि 'जमाअत-ए-इस्लामी'च्या व्यवस्थापनाचेही दोन विभाग झाले. भारतात ही संघटना 'जमाअते-ए-इस्लामी हिंद' या नावाने सुरु होऊन या संघटनेचे प्रमुख 'माननीय मौलाना अबुललैस इस्लाही साहेब' नियुक्त झाले. तसेच संघटनेची पुनर्रचना होऊन हिचे केंद्र 'महमूद-नगर, मलिहाबाद लखनौ' येथे स्थापित झाले.

## ८) प्राथमिक विद्यालयाची स्थापना

संघटना उभारणीनंतर या समस्यांचे पूर्ण समाधान झाले नसले तरी आणि वस्तुस्थिती तर मुळात अशीच होती की फाळणीनंतर उद्‌भवलेल्या स्फोटक परिस्थितीमुळे स्थिती आणखीनच गंभीर झाली होती आणि या परिस्थितीत शिक्षणाची आवश्यकता जास्तच भासत होती. आमचे एक सहयोगी मित्र 'मुंशी हिदायत अली' यांनी या कार्यास्तिव 'मलिहाबाद' येथील एक बगिचा समर्पन करुन आर्थिक समस्या दूर केली. म्हणून संघटनप्रमुख 'मौ. अबुलैस इस्लाही' यांनी किमानरीत्या प्राथमिक विद्यालय स्थापन करून टाकले. त्यांनी या शाळेच्या स्थापनेनंतर आपल्या पहिल्याच भाषणात म्हटले,

"विद्यालय आणि प्रशिक्षण केंद्रसुद्‌धा आपल्या केंद्राचा एक आवश्यक भाग आहे. परंतु सध्या आम्ही आपल्या ऐपतीनुसार केवळ एवढेच करू शकतो की, 'रमज़ान'च्या महिन्यानंतर प्राथमिक स्तरावर बालवाडी सुरु करुन, ज्यामध्ये संघटनेच्या सहयोग्यांची मुले आणि आपल्या अटी व शर्तींवर सहमत असलेल्या स्थानिक लोकांची मुले दाखल करण्यात येतील. या बागेचाच आधीपासूनच एक छोटीशी इमारत आहे. तिची थोडीफार डागडुजी करून तिचा वापर करण्यात येईल. तसेच जसजशी परिस्थिती सुधारत जाईल, तसतशी प्रगती करण्यात येईल. या शाळेसाठी आपल्याला लागलीच दोन अनुभवी आणि विश्वासातील शिक्षकांची गरज आहे. शैक्षणिक अनुभवाबरोबरच ते आपल्या संघटनेच्या विचारसरणी आणि उद्देशाची चांगली जाणीव असलेले असावेत. या बाबतीत संघटनेच्या काही सहयोग्यांशी बोलणी केली, जे या कामात प्रवीण असून शैक्षणिक उद्देशाची चांगली जाणीव असणारे आहेत. गरज पडल्यास आपण त्यांच्यावर शिक्षण सेवेची जवाबदारी टाकू शकतो. मला याची पूर्ण जाणीव आहे की, आपल्या विचारसरणीच्या आधारावर असलेल्या शिक्षण पद्‌धतीमुळे आपले सहयोगी खूप चिंताग्रस्त आहेत. सर्व सामान्य शाळा आपल्या शाळेच्या कसोटीवर उतरत नाहीत आणि प्रत्येक ठिकाणी आपल्या धोरणावर आधारित शाळा चालविणे आपल्याच्याने शक्य नाही. म्हणून आम्ही प्रत्येक राज्यातील संघटना सचिव आणि संघटनाप्रमुखांना सूचना दिल्यात की, त्यांनी शक्य होईल तेवढे लवकर आपल्या ठिकाणच्या परिस्थितींचा आढावा घेऊन माहिती कळवावी की, संघटनसदस्य आणि सहयोग्यांची किती मुले आहेत जे शिक्षण घेण्यासाठी संघटन केंद्रात येऊ शकतात. तसेच त्यापैकी कितीजण असतील जे आपल्या मुलांच्या शिक्षणाचा खर्च स्वत: उचलण्यास पात्र आहेत. या माहितीमुळे आपल्याला आपले शिक्षण कार्य व्यवस्थित चालविण्यासाठी पुढील धोरण तयार करता येईल."

(संदर्भ : अल-इन्साफ १३ जुन इ.स. १९४८)

आपल्या भाषणानुसार संघटनप्रमुखांनी २८ ते २९ ऑगस्ट इ.स. १९४८ च्या चर्चासत्र परिषदेत विद्यालयाचा प्रश्न मांडला. सविस्तर चर्चेनंतर सर्वांच्या सहमतीने हे ठरविण्यात आले की,

शैक्षणिक व्यवस्थेचा प्रथम घटक असलेली प्राथमिक शाळा तत्काळ सुरु करावी. बगिच्यातील इमारतीत आवश्यक परिवर्तन करून विद्यार्थ्यांची शाळा, आणि वसतिगृह कायम करावे. हेसुद्धा ठरविण्यात आले की, विद्यार्थ्यांच्या शिक्षण प्रशिक्षणासाठी 'मुहम्मद शफी मोनिस आणि अफझल हुसैन साहेब' हे दोघे अथवा यांच्यासारखे इतर दोनजण की जे अनुभवी आणि आधुनिक विचारसरणीच्या शिक्षण पद्धतीवर प्रभुत्व ठेवणारे दोनजण असतील.

याच परिषदेत हेपण ठरविण्यात आले की, या शाळेकरिता दोन समित्या नेमण्यात येतील. एक कायदा समिती आणि दुसरी अभ्यासक्रम समिती. कायदा समितीत माननीय अब्दुल-हई साहेब, मौ. सदरुद्दीन साहेब आणि मोनिस साहेब असतील. हे आपले कार्य चर्चापरिषद संपेपर्यंत पूर्ण करतील. जेणेकरून यानुसार प्रवेश प्रक्रियेत इतर कार्य सुरु करता येईल. अभ्याक्रमासाठी असलेल्या दुसऱ्या समितीमध्ये उपरोल्लेखित तीन व्यक्तीं व्यतिरिक्त अफ़झल- हुसैन साहेब आणि यूसुफ साहेब इलाहाबादी यांची नावे ठरविण्यात आलीत. तसेच मौ. अब्दुल हईसाहेबांच्या विनंतीवरून हे ठरविण्यात आले की, या समितीची सभा रामपूरमध्ये २८ सप्टेंबर मध्ये घेण्यात येईल आणि महिना अखेरीस समितीने आपला रिपोर्ट केंद्रास सादर करावा. अभ्यासक्रम निर्मितीसाठी आवश्यक सल्ले आणि सूचना देण्याची जवाबदारीसुद्धा या समितीवर टाकण्यात आली.

चर्चा परिषदेच्या ठराव क्र.१ नुसार कायदा समितीने सभेमध्ये निम्ननिखित कार्यविधान सादर केले.

## ९) जमाअते इस्लामी हिंदच्या प्राथमिक शाळेचे कार्यविधान

जमाअते इस्लामी हिंद संघटनेला सुरुवातीतच आपल्या विशेष शिक्षण धोरणानुसार विद्यालयाची आवश्यकता भासली होती. परंतु परिस्थिती बदल आणि असंख्य अडचणीमुळे यात खूप दिरंगाई झाली. शेवटी भारताच्या फाळणी आणि इलाहाबाद येथील सभेनंतर (२० एप्रिल १९४८ इ. सन. या काळात भारतात संघटन रचनाचे आणि अध्यक्ष निवडीचा निर्णय घेण्यात आला होता.) अध्यक्षांनी आवाहन केले की, किमान एक प्राथमिक शाळा तरी स्थापन करण्यात यावी. म्हणून सुरुवातीच्या चार वर्षांकरिता शिक्षणाची व्यवस्था करण्यात येत आहे.

१) प्रवेश : अ) या शाळेत केवळ त्यांच्याच मुलांना प्रवेश मिळेल जे 'जमाअते इस्लामी हिंद' च्या विचारसरणीशी केवळ सहमतच नसून प्रवेशप्रसंगी लेखी प्रतिज्ञापत्र देतील की, त्यांनी आपली मुले 'जमाअते इस्लामी हिंद'च्या विचारसरणीस आणि तिच्या सेवेत समर्पित केली आहेत.

ब) प्रथम वर्गात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या मुलांचे किमान सहा आणि कमाल आठ वर्षे वय असेल. म्हणून प्रत्येक मुलाच्या पालकांचे प्रवेश अर्ज निश्चित केलेल्या मुदतीच्या आत यावेत.

**नोट**

दरम्यानच्या वर्गात प्रवेश घेऊन इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रवेश परिक्षणार्थ ठराविक मुदतीपर्यंत (ही मुदत कमाल तीन महिन्यांची असेल) विशेष इयत्तेत (Specialclass) ठेवण्यात येईल.

२) शिक्षणाचा कालखंड : अ) प्राथमिक शाळेची शिक्षण मुदत आठ वर्षे असेल. ब) शैक्षणिक वर्ष दोन सत्रावर विभागण्यात येईल. पहिले शिक्षणसत्र ६ शव्वाल ते ५ रबिउल अव्वलपर्यंत आणि दुसरे शिक्षण सत्र २१ रबिउल अव्वल ते २५ शाबानपर्यंत असेल.

३) परीक्षा : अ) प्रत्येक सत्रांत विद्यार्थ्यांचे कार्य पडताळून पाहण्यात येईल. कारण आपल्याला विद्यार्थ्यांच्या बौद्धिक, कार्यात्मक नैतिक आणि शारीरिक या सर्व बाजूंचे सर्वांगीण बाजू पाहायच्या आहेत. परीक्षाच्या प्रचलित पद्धती आपल्याकरिता योग्य ठरणार नाहीत. या संपूर्ण माहितीसाठी प्रगती सूची ठेवणे लाभदायक ठरेल. या प्रगती सूचींमध्ये दरमहिण्यास परीक्षण घेण्यात येईल. मुलांना त्यांच्या नैसर्गिक गतीपेक्षाही पुढे करण्याचे प्रयत्न करण्यात येईल. जर एखादा विद्यार्थी प्रगती सूचीनुसार आपल्या अपेक्षेच्या कसोटीवर उतरत नसेल तर शक्यतो त्याच्यातल्या त्रुटी भरून काढण्याचा प्रयत्न करण्यासाठी विशेष व्यवस्था करण्यात येईल अथवा दुसऱ्या वर्षीही त्यास याच वर्गात ठेवण्यात येईल.

ब) प्राथमिक शाळेतील अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांपैकी केवळ असेच विद्यार्थी माध्यमिक शाळेत घेण्यात येतील, ज्यांच्या परीक्षांचे निकाल उत्तीर्ण स्वरुपाचे असतील.

४) सुट्या आणि रजा : अ) प्रथम सत्र पूर्ण झाल्यावर पंधरा दिवसांच्या आणि दुसरे सत्र पूर्ण झाल्यावर एक महिना दहा दिवसांच्या सुट्या देण्यात येतील.

ब) या शिवाय शुक्रवार आणि विशेष इस्लामी महोत्सवांप्रसंगीसुद्धा सुट्टी देण्यात येईल.

क) आजारपण अथवा यासारख्या इतर कठीण प्रसंगी मुख्याध्यापकास लेखी विनंती करून रजा घेता येईल. या शिवाय कोणत्याही विद्यार्थ्यास गैरहजर राहता येणार नाही.

५) फी आकारणी : अ) प्रवेश, वाचनालय अथवा वसतिगृहासाठी कोणतीच फी आकारण्यात येणार नाही.

ब) पाणी, वीज, स्वच्छता आणि स्वयंपाकगृहासाठी लागणारी फी (फक्त वीस रुपये प्रती विद्यार्थी) विद्यार्थ्यांना भरावी लागणार. प्रवेशप्रक्रियेवेळीच पालकांनाही फी भरावी लागेल. प्रत्येक महिण्यास शाळेच्या जमाखर्चाची लेखी प्रत पालकांना पाठविण्यात येईल. दुसऱ्या महिन्याच्या पंधरा तारखेच्या आंतच त्यांचा भरणा होणे आवश्यक आहे.

क) आवश्यक स्टेशनरी आणि पाठ्य पुस्तके विद्यार्थ्यांना स्वत: खरेदी करावी लागतील. याची व्यवस्था सामूहिकरीत्या करण्यात येईल.

६) वसतिगृह अ) शाळा वसतिगृहासहित असेल. कोणत्याही प्रकारची विशेष अडचण नसताना विद्यार्थ्यास वसतिगृहाबाहेर राहता आणि जेवता येणार नाही. शाळेच्या सीमेत राहणाऱ्या पालकांना जास्तीतजास्त सवलत एवढी असेल की त्यांना आपल्या पाल्यांच्या जेवणाची व्यवस्था घरी करता येईल. परंतु निश्चित वेळेवर आपल्या पाल्याचे जेवण शाळेत पाठविणे आवश्यक ठरेल.

ब) स्वयंपाकगृह आणि वसतिगृहाच्या इतर विभागाच्या व्यवस्थांची जबाबदारी स्थानिक प्रतिनिधीवर असेल, जे शाळा व्यवस्थापकाच्या मार्गदर्शनानुसार आपली कर्तव्ये पार पाडतील.

७) वाचनालय आणि ग्रंथालय : विद्यार्थ्यांच्या अभ्यास व अध्ययनाकरिता योग्य पुस्तके, वर्तमानपत्र आणि मासिके पुरविण्यात येतील.

८) शारीरिक प्रशिक्षण : विद्यार्थ्यांच्या शारीरिक विकासासाठी योग्य प्रमाणात व्यायाम, क्रीडा आणि मनोरंजनाची व्यवस्था करण्यात येईल.

समितीने अशा स्वरुपाचे कार्यविधान तयार करून संघटन प्रमुखांना सादर केला आणि मंजुरीनंतर जनतेच्या माहितीस्तव तीन दिवसीय वृत्तपत्र 'अल इन्साफ (उर्दू) च्या २८ सप्टें. १९४८ च्या अंकात प्रकाशित केला.

चर्चा परिषदेच्या ठराव क्र. २ नुसार २८ सप्टेंबर १९४८ इ.स. रोजी 'अभ्यासक्रम समिती'ची सभा रामपूर (उत्तरप्रदेश) येथे झाली. या सभेत 'अफझल हुसैन साहेब, मुहम्मद शफ़ी साहेब मोनिस, मुहम्मद यूसुफ साहेब (महासचिव जमाअते इस्लामी हिंद), मौ. जलील अहसन नदवी आणि मुहम्मद अब्दुल हई साहेब या मान्यवरांनी हजेरी लावली. अभ्यासक्रमाच्या आराखड्याचे स्वरुप संपादित करून जनतेच्या माहितीस्तव तीन दिवसीय वृत्तपत्र 'अल इन्साफ' (उर्दू) च्या २०-२३ मार्च १९४८ इ. स. च्या अंकात प्रकाशित करण्यात आले.

चर्चा परिषदेच्या ठराव क्र.१ च्या दुसऱ्या घटकानुसार मुन्शी हिदायत अली यांनी इमारतीच्या आवश्यक बदलाचे काम हि. स. १३६८ च्या 'सफर' महिन्याशेवटी पूर्ण करताना अफझल हुसैनसाहेब आणि मुहम्मद शफी साहेब यांना बोलावून घेतले. याप्रमाणे शाळेचे उद्घाटन 'अल-इन्साफ'मध्ये जाहीर करून हि. सन १३६८ च्या रबिउल अव्वलंच्या एक तारखेस २१ विद्यार्थ्यांच्या प्रवेशासह शाळेचा शुभारंभ झाला. हे विद्यार्थी आपापल्या पात्रतेनुसार चार वर्गात दाखल झाले.

पहिल्या वर्षाच्या शिक्षणाचे कार्य 'महमूद नगर, मलिहाबाद' येथे पूर्ण झाले. परंतु २३

ज़ीलकादा १३६९ रोजी संघटनेचे केंद्र मलिहाबाद वरून रामपूरला स्थलांतरीत झाल्याने ही शाळाही रामपूरला स्थलांतरित झाली. रामपूरमध्ये एक शाळा पूर्वीपासूनच कार्यरत असल्याने तिलापण या केंद्रीय शाळेत समाविष्ट करण्यात आले. हे शाळेचे दुसरे वर्ष होते. म्हणून पाचव्या वर्गाची वाढ झाली. रामपूरच्या स्थानिक शाळेत शौकत अली साहेब आणि अब्दुल वहीद खान हे शिक्षण सेवक म्हणून कार्यरत होते. करीता आता शिक्षकांची चार झाली. तसेच दोन्ही शाळांच्या एकूण विद्यार्थ्यांची संख्या ५५ एवढी झाली. विद्यार्थ्यांची देखरेख आणि इतर गरजा लक्षात घेता दोन काळजीवाहू (House Master) नेमण्यात आले.

शाळेचे दुसरे वर्ष सुरळीतपणे संपले. आता ६ शव्वाल १३६९ हि. सनापासून तिसरे वर्ष सुरु होईल. ईश्वर कृपेने सहावा वर्ग सुरु होईल. अशा प्रकारे आम्ही पुढे चालून काम सुरु ठेवत आहोत.

## १०) अभ्यासक्रमाची तयारी

शिक्षण प्रशिक्षणाच्या बाबतीत आमची जी संकल्पना आहे, त्यानुसार प्रचलित पाठ्यपुस्तक आमच्यासाठी योग्य नाही. शाळा स्थापनेच्या वेळी आपल्या संकल्पनेवर आधारित अभ्यासक्रम निर्मितीचा उद्देश आमच्या पुढे होता. परंतु बऱ्याच अडीअडचणीमुळे या कामातही दिरंगाई होत आहे. केवळ थोडीच पुस्तके तयार करणे शक्य झाले. त्यांचा खाली उल्लेख करीत आहोत.

केंद्रीय शाळा क्र. १ : यासाठी 'आपले पुस्तक'च्या बाबतीत असलेली उजळणी 'पहिले पुस्तक', दुसरे पुस्तक आणि तिसरे पुस्तक 'आपली पोथी' प्राथमिक पहिला भाग, दुसरा भाग (तिसरा आणि चौथा भाग लवकरच प्रकाशित करण्यात येईल.)

या पुस्तकांची काही वैशिष्ट्ये अशी आहेत की, ''मुलांचे शिक्षण-प्रशिक्षण हे एक धार्मिक कर्तव्य आहे. लहाणपणी त्यांना मातृभाषेतच शिक्षण देणे योग्य आहे. परंतु सध्याच्या बहुतेक विद्यार्थ्यांना मातृभाषेतील पाठ्यपुस्तके उपलब्ध नाहीत. आणि जी पुस्तके उपलब्ध आहेत ती तात्त्विकरीत्या परिपूर्ण नाहीत. या मुलांची प्रवृत्ती, स्वाभाविक आकर्षण, प्रगतीचे विभिन्न पल्ले आणि प्रत्येक पल्ल्याच्या स्वाभाविक स्वरुपांनी ही पुस्तके अपूर्ण असल्याने ही पाठ्यपुस्तके मुलांकरिता अतिशय आकर्षणरहित आणि कंटाळवाणे असतात व मुलांना हे शिक्षण किळसवाणे वाटते. जी पाठ्यपुस्तके शिक्षण कौशल्यांनी परिपूर्ण आहेत, त्यांत पावलो पावली निधर्मी आणि इस्लामच्या मौलिक तत्त्वांविरोधी घटक आहेत. अशा परिस्थितीत मुलांची प्रवृत्ती अगदीच भौतिकवादी होऊन आपली नवीन पिढी विश्वभूमीत उपद्रव निर्माण करणारी ठरेल. याच बाबींमुळे आपल्याला पाठ्यपुस्तकांची नवीन पुस्तके तयार करणे गरजेचे ठरले. 'आपले पुस्तक' या नावाची

पाठ्यपुस्तक शृंखला याच वाईट बाबीं टाळण्यासाठी सुरु करण्यात आली. असून यामध्ये उजळणीव्यतिरिक्त आठ भाग पुस्तिका स्वरुपात असेल. या पाठ्यपुस्तकांच्या तयारीत सर्वांत मोठा आणि महीम भाग शिक्षकाचे आदेश आपल्याकरिता मुख्य मार्गदर्शन आहे. आम्ही शिक्षणाविषयी मुलांमध्ये आकर्षण निर्माण करण्यास्तव तसेच शिक्षण जास्तीतजास्त सरळ व सोपे करण्यास्तव शक्यतोपरी प्रयत्न केले आहेत. त्यामध्ये अशाप्रकारचा सराव ठेवण्यात आला आहे की, विद्यार्थ्यांत श्रवण, दृष्य आणि आकलनात लक्षणीय प्रगती व्हावी आणि सुरुवातीपासूनच संशोधनात्मक अभ्यासाची सवय पडावी.

या पुस्तकांच्या तयारीसाठी आम्ही शिक्षणतज्ञांचे विचार आणि साहित्यिक व कवींच्या कौशल्यांचा पुरेपूर वापर केला. या शृंखलेचे इतर बाकीचे भाग आणि इतर निबंध मजकुरांवर पुस्तकांच्या संपादनाचे कार्य सुरु असून थोड्याच दिवसांत आमच्या प्रयत्नांचे परिणाम समोर येतील.

## १०) माध्यमिक आणि उच्च शिक्षण

या पुस्तकातील मागील पृष्ठांच्या अभ्यासावरून ही बाब स्पष्ट झालीच असेल की, आपले अंतिम लक्ष्य हे प्राथमिक शिक्षण पूर्ण करणेच नसून माध्यमिक आणि उच्च शिक्षणाची व्यवस्थासुद्‌धा करावयाची आहे. परंतु अद्याप प्राथमिक शिक्षण व्यवस्थेचे कार्यच अपुरे आहे. म्हणून पुढील पाऊल उचलण्याचे धाडस कसे करता येईल ? तरी सुद्‌धा आम्ही पुढील उद्देशापासून गाफील नसून सध्यातरी या प्रयत्नाचीच सुरुवात केली आहे. जे आधुनिक शिक्षण घेतलेले विद्यार्थी धार्मिक शिक्षणही घेऊ इच्छितात त्यांच्याकरिता केंद्रामध्ये व्यवस्था करण्यात आली आहे. या वेळी या केंद्रात सात विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतला आहे आणि अशा आहे की त्यांच्या संख्येत निश्चितच वाढ होईल.

या विद्यार्थ्यांकरिता अभ्यासक्रम संपादन करण्याचा उद्देशसुद्‌धा विचारात आहे. हे कार्यसुद्‌धा पूर्ण झाल्यास जाहीर करण्यात येईल.

# प्रकरण सातवे

# इस्लामी विद्यापीठाचे स्वरुप

विविध मुस्लिम देशांत अशा तजवीजी सुरु आहेत की, मुस्लिमांच्या शिक्षणात मौलिक बदल करण्यात यावे. एका अशा आधुनिक प्रणालीवर आधारित इस्लामी शिक्षणाच्या संस्था उभ्या करण्यात याव्यात आणि त्यात मुस्लिम तरूणांना इस्लामच्या मूळ आणि केंद्रीय उद्दिष्टानुसार विश्व मार्गदर्शनासाठी तयार करण्यात यावे. परंतु यावेळी अशा स्वरुपाच्या जेवढ्या संस्था उभ्या करण्यात आल्या आहेत, त्यांचे स्वरुप आणि कार्यपद्धती पाहून इस्लामी जगताच्या विचारवंताना जी बाब आवश्यक असते ती तर एका दारूल उलूम (अरबी महाविद्यालय) मध्येही आढळत नाही आणि कोणत्याही आधुनिक विद्यापीठातही आढळत नाही. आपला उद्देश असा आहे की आपणास या विश्वामध्ये इस्लामचे ध्वजधारी निर्माण करावयाचे आहेत.

## अ) वर्तमान शिक्षण व्यवस्था

इंडोनेशिया ते मोरॅक्कोपर्यंत सर्व मुस्लिम देशांत सध्या दोन प्रकारचे शैक्षणिक धोरण राबविण्यात येत आहे. एका शिक्षण धोरणात शुद्ध पाश्चात्य विचारसरणी असणारे आणि पाश्चात्य संस्कृतीमध्ये पूर्णत: रंगलेली माणसे तयार करण्यात येत आहेत. आश्चर्याची बाब अशी की पाश्चात्य रंगात रंगलेल्या निधर्मी शिक्षण व्यवस्थांतून शिक्षण घेतलेले लोक मुस्लिम देशांची शासन व्यवस्था चालवित आहेत. त्यांच्याच हाती अर्थव्यवस्था आणि वित्तीय कारभार असून राज्यव्यवस्थेचा कासराही त्यांच्याच हातात आहे. तसेच तेच लोक संस्कृती व सभ्यतेची रचना करीत आहेत. परंतु हे लोक सामान्यत: धर्माच्या ज्ञान व आकलनापासून दूर आणि पाश्चात्यांच्या प्रत्येक वस्तुने अत्यंक प्रभावित आहेत. म्हणूनच हे लोक जगभरात मुस्लिम जनसमुदायाचा गाड़ा दिवसेंदिवस आणि खूप गतीने इस्लामी दिशेविरुद्ध नेत आहेत.

दुसरी शिक्षण व्यवस्था केवळ धार्मिक ज्ञानावर आधारित असून तिचे निमर्ति मुल्ला-मौलवी आहेत. या धार्मिक शिक्षणातही केवळ पारलौकिक बाबीं आणि धर्मकांडाचेच शिक्षण आहे व ऐहिक जीवनासाठी आवश्यक असलेल्या धार्मिक शिक्षणाशी पूर्णत: विभक्त आहेत. हे विद्यार्थी जगामध्ये कोठेच या पात्रतेमुळे स्वावलंबी बनू शकत नाहीत. त्यांच्याच जीवनाचा गाडा चालविण्याची कोणतीच लायकी निर्माण होत नाही. एवढेच नव्हे तर हे लोक जीवनाच्या प्रत्येकमार्गात ब्रेक लावण्याचेच काम करीत आहे. उपरोल्लेखित प्रथम समुदायाच्या इस्लामविरोधी दिशेत जाणाऱ्या गाडीस ब्रेक लावण्यापेक्षा जास्त काही यांना करता येत नाही. परंतु आम्हास स्पष्ट दिसत आहे की, दिवसेंदिवस हा ब्रेक निकामी होत जात आहे. एवढेच नव्हे

तर काही देशांत तर मस्तावलेला ड्रायव्हर हा ब्रेकच तोडून जात आहे आणि निधर्मी आणि पातक मार्गांवर सुसाट वेगाने धावत आहे. प्रत्येक ठिकाणचा ब्रेक तुटण्यापूर्वीच आपल्याला एक अशी शिक्षण व्यवस्था स्थापन करावी लागणार आहे, की यातून निर्माण होणारे विद्यार्थी ब्रेकचे काम न करता इस्लामी जनसमूहाच्या गाड़ीचा कुशल ड्रायव्हर तयार व्हावेत. ते आपल्या नीतिमत्ता आणि भूमिका व इतर कौशल्यात पाश्चात्यांपेक्षाही पुढे गेलेले असावेत.

ही गरज जगातील कोणतीच मुस्लिम शिक्षण व्यवस्था पूर्ण करताना दिसत नाही. इस्लामी जगताचे सर्व विद्वान चिंताग्रस्त आहेत की, अशी शिक्षण व्यवस्था स्थापन न झाल्यास मुस्लिम जनसमुदायास धार्मिक आणि नैतिक अधोगतीपासून कसे वाचविता येईल. अशा प्रकारची शिक्षण व्यवस्था सांभाळणाऱ्यांची अवस्था सर्वांनाच माहीत आहे. म्हणून माझ्यासमोर या शिवाय दुसरा कोणताच पर्याय शिलक नाही, की यशस्वी शिक्षण व्यवस्थेचा जो आराखडा माझ्याकडे तयार आहे, तो मी इस्लामी जगता समोर मांडावा जेणेकरून कदाचित विद्वान मंडळी यास पसंत करून जगातील एखादे मुस्लिम शासन याच्या पूर्णत्वाची जबाबदारी स्वीकारेल. हे ईश्वरा ! तूच काही दानशूर जणांना या पुण्यकार्याची सुबुद्धी दे !

## ब) इस्लामी विद्यापीठाचे हेतू आणि गरजा

या विद्यापीठाच्या स्वरुपाची संकल्पना मी अतिशय थोडक्यात मांडणार आहे.

१) सर्वांत जास्त गरज या गोष्टीची आहे की, या विद्यापीठाचा हेतू स्पष्ट करण्यात यावा, जेणेकरून संपूर्ण शिक्षण व्यवस्था याच आधारावर स्पष्ट करता यावी. यात काम करणारेसुद्धा याच दृष्टिकोनाचे असावेत आणि पाहणाऱ्यांनीसुद्धा याच प्रमाणावर परीक्षण करावे. माझ्या दृष्टिकोनानुसार याची उद्दिष्ट अशा असावीत,

"यातून असे सज्जन व सुशील विद्वान तयार व्हावेत, जे या आधुनिक काळात सुव्यवस्थितपणे सत्यधर्मानुसार जगाचे मार्गदर्शन करण्याच्या लायकीचे असावेत."

२) या व्यवस्थेची कार्यसीमा केवळ इस्लामी शास्त्रांपर्यंत मर्यादित ठेवण्यात यावी. इतर विषयांचे शिक्षण हे केवळ धर्मशास्त्राचे सहकारी विषय असावेत. कारण विद्यापीठात इतर विषयांचे तज्ञ निर्माण करायचे नसून आपला मूळ उद्देश पूर्ण करायचा आहे.

३) हे विद्यापीठ वसतिगृहासहित असावे, जेणेकरून विद्यार्थ्यांचा पूर्ण वेळ शिक्षण प्रशिक्षणासाठी मिळावा. त्याचप्रमाणे शिक्षकवर्गसुद्धा विद्यापीठातच वास्तव्यास असावा.

४) हे विद्यापीठ संपूर्ण जगातील विद्यार्थ्यांसाठी खुले असावे.

५) येथील संपूर्ण वातावरण विद्यार्थ्यांत ईशपरायणता आणि उच्च नीतीमत्ता निर्माण करणारे आणि इस्लामी कृती संस्कृतीस स्थैर्य देणारे असावे. पाश्चात्य संस्कृतीने प्रभावित होऊन प्रत्येक राष्ट्रात न्यूनगंडाची भावना निर्माण होत असल्याने विद्यार्थ्यांना या संस्कृतीपासून पूर्ण सुरक्षित ठेवावे. म्हणून परिसरसीमेत पाश्चात्य पोषाखावर बंदी असावी. क्रीडा आणि मनोरंजनासाठी पाश्चात्य पद्धतींचा अवलंब मुळीच करू नये. यासाठी घोडेस्वारी, मोटारसायकल स्वारी व इतर प्रकारचे धाडसी सराव घेण्यात यावेत. याबरोबरच त्यांना काही प्रमाणात लष्करी प्रशिक्षणही द्यावे.

६) यामध्ये शिक्षकांच्या नियुक्त्या केवळ ज्ञानाच्या आधारावर होता कामा नये. शिक्षक नियुक्त करताना त्यांची श्रद्धा विचारसरणी आणि सुशील वृत्ती, ईशपरायणता आणि नैतिकता तपासूनच काम करावे. या शहानिशा झाल्यावर शिक्षकांना इस्लामी जगताच्या विभिन्न देशांतून निवडून सर्वात जास्त गाढ श्रद्धा, इस्लामचे अनुकरण करणारे आणि पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावाने न्यूनगंड निर्माण न झालेले पात्र शिक्षक नियुक्त करावेत. मला तर हेसुद्धा आवश्यक वाटते की, विद्यापीठासाठी ज्यांची निवड करण्यात येईल, त्यांच्या बाबतींत समाधानकारक शहानिशा करावी की त्यांच्या परिवारातील लोकसुद्धा सच्चे पक्के मुस्लिम असावेत. ज्या शिक्षकांच्या घरच्या स्त्रिया पाश्चात्य संस्कृतीत बरबटलेल्या असतील आणि ज्या शिक्षकांच्या घरातून वाद्यात गीतांचा सूर निघत असेल, अशा शिक्षकांचा निश्चितच विपरीत परिणाम विद्यार्थ्यांवर होईल.

७) येथील विद्यार्थ्यांना असे प्रशिक्षण देण्यात यावे की, त्यांच्यात खाली उल्लेखण्यात येणारे गुणधर्म निर्माण व्हावेत.

अ) इस्लाम आणि इस्लामी संस्कृतीविषयी नितांत आदर आणि स्वाभिमान तसेच इस्लामी संस्कृती पूर्ण जगात लागू करण्याचा ठोस निश्चय.

आ) इस्लामी नैतिकता आणि इस्लामी नियमांचे काटेकोर पालन

इ) धर्मशास्त्रात साकल्यशक्ती

ई) संकुचित बुद्धीतून मुक्त

उ) भाषण, लिखाण आणि संवाद व चर्चेचे पूर्ण कौशल्य तसेच धर्म प्रसारास्तव योग्य पात्रता.

ऊ) श्रम, कष्ट, स्फूर्ती आणि स्वावलंबन

ए) संघटन, व्यवस्थापन आणि नेतृत्वाचे कौशल्य

८) माध्यमिक शिक्षणपूर्ण झालेल्या विद्यार्थ्यांनाच येथे प्रवेश देण्यात यावा. अरबदेशातील विद्यार्थ्यांना येथे सरळ प्रवेश घेता येईल. परंतु अरबेतर विद्यार्थ्यांना अरबी भाषा पूर्णत: अवगत नसल्यास त्यांच्यासाठी प्रवेशपूर्ण एका वर्षाची तयारी करून घेऊन त्यांना अरबीचे पूर्ण ज्ञान देण्यात येईल.

९) येथील शिक्षण नऊ वर्षांत तीन खंडात विभागण्यात यावे. प्रथम कालखंड चार वर्षीय, दुसरा कालखंड तीन वर्षीय आणि तिसरा कालखंड दोन वर्षाचा असावा.

**१०) प्रथम कालखंडाचा अभ्यासक्रम :**

या कालखंडात निम्नोल्लेखित विषय शिकविण्यासाठी चार वर्षीय कालखंडावर हे विषय विभागावेत.

**अ) इस्लामी श्रद्धा :-** दिव्य कुरआन आणि प्रेषित जीवनीनुसार वर्णणात्मकरीत्या याच्या समर्थनार्थ बौद्धिक आणि तात्विक पुरावे.

**आ) इस्लामी जीवनव्यवस्था :-** या विषयात विद्यार्थ्यांना संपूर्ण इस्लामी जीवनव्यवस्थेची पूर्णत: शिकवण द्यावी. ज्या सत्य कल्पनांवर इस्लामचा मूळ सिद्धान्त आधारित आहे, या आधारावर इस्लामने मानवाची नैतिकता आणि आचरणव्यवस्था संपादित केली. मग घर आणि परिवार तसेच अर्थशास्त्र, राज्यशास्त्र आणि आंतरराष्ट्रीय संबंधापर्यंत मुस्लिम समाजेच विभिन्न विषय ज्या नियम आणि तत्वांवर व्यवस्थापित झाले आहेत, यावरून संपूर्ण संस्कृतीचे स्वरुप विद्यार्थ्यांसमोर यावे.

**इ) कुरआन :-** चार वर्षांत संपूर्ण कुरआन संक्षिप्त वर्णणासह शिकविण्यात यावे. याकरिता कुरआन वर्णणाचे एखादे विशेष ग्रंथ निश्चित करण्याऐवजी शिक्षकाने स्वत: विविध ग्रंथांचा अभ्यास करून अशा प्रकारे कुरआनाचे व्याख्यान द्यावे की, विद्यार्थ्यांना ईशग्रंथाचे उद्दिष्ट आणि हेतू चांगल्यारीतीने कळावे.

**ई) हदीस (प्रेषित कथनशास्त्र) :-** याविषयी थोडक्यात इतिहास आणि हदीसशास्त्र तसेच हदीस तत्व विद्यार्थ्यांना शिकविण्यात यावे.

**उ) फ़िक्ह (इस्लामी आचरणविधी) :-** याविषयात फ़िक्हचा इतिहास आणि तत्त्वांवर एक एक संक्षिप्त पुस्तक शिकविल्यानंतर विद्यार्थ्यांना फ़िक्ह (इस्लामी आचरणविधी) चे शिक्षण अशा प्रकारे देण्यात यावे, की विभिन्न विधीतज्ञांच्या भूमिकांचे ज्ञान व्हावे. तसेच हे पण विद्यार्थ्यांना आकलन व्हावे, की प्रमुख विधीतज्ञांनी कशा प्रकारे साकल्य शक्तींचा वापर करून इस्लामी जीवनविधीचे नियम तयार केले.

**ऊ) इस्लामचा इतिहास :-** या विषयाची सुरुवात प्रेषितांच्या इतिहासाने व्हावी. आणि मग प्रेषित मुहम्मद (स) यांच्या जीवनप्रणाली आणि प्रेषित सोबत्यांपैकी चार इस्लामी शासकांचा इतिहास वर्णणात्मकरीत्या शिकविण्यात यावा. यानंतर थोडक्यात संपूर्ण इतिहास विद्यार्थ्यांना शिकविण्यात यावा.

ए) समाजशास्त्र (Social Sciences) :- याविषयात विशेषत: समाजशास्त्र, राज्यशास्त्र सारखे विषय असावेत. या विषयांच्या शिक्षणासाठी अशा शिक्षकांची नियुक्ती करण्यात यावी जे इस्लामी दृष्टिकोनानुसार समीक्षणात्मक शिक्षण देऊ शकतात. त्याचप्रमाणे पाश्चात्य समाजशास्त्रे जसेच्या तसे विद्यार्थ्यांच्या बुद्धींवर थोपू नये.

ऐ) जगातील धर्म :- या विषयात विशेषत: ज्यू धर्म, ख्रिश्चन धर्म, बौद्ध धर्म, जैन धर्म आणि हिंदु धर्माचा थोडक्यात अभ्यास असावा.

ओ) आधूनिक पाश्चात्य विचारसरणी :- या विषयात थोडक्यात इतिहास व संक्षिप्त इतिहास आणि त्यांचे धर्म, विशेषत: पाश्चात्य प्रजातंत्र, साम्यवाद आणि जातीवादाची माहिती असावी.

**अं) इंग्रजी, जर्मन आणि फ्रेंच पैकी एक भाषा असावी.**

**११) दुसऱ्या कालखंडाचा अभ्यासक्रम :**

या कालखंडात पाच विभाग (Faculties) असावेत. १) तफ़सीर २) हदीस ३) फिक्ह ४) युक्तिवाद शास्त्र आणि ५) इतिहास

१) तफसीर (कुरआन वर्णनाचे ग्रंथ) :- या विभागात निम्नोल्लेखित विषय असतील.

१) कुरआनविषयी इतिहास २) कुरआन वर्णणाचा इतिहास आणि वर्णन तज्ञांच्या विभिन्न वैशिष्ट्यांची माहिती. ३) कुरआन पठनातील विभिन्न प्रणाली, ४) कुरआनाचे वर्णन करण्याचे विषय ५) कुरआनाचा सखोल अभ्यास ६) विरोधकांकडून घेण्यात आलेल्या आक्षेपांचा आढ़ावा ७) कुरआनाचे नियम व आदेश

२) हदीस (प्रेषित कथन व कार्यशैली) :- या विभागात (Facutty) १) हदीस संपादनाचा इतिहास, २) सर्व शाखांसहित हदीसशास्त्र, ३) हदीसच्या प्रमुख ग्रंथापैकी एखादा ग्रंथ, ४) हदीसच्या सहा प्रमाणसिद्ध ग्रंथांवर एक अभ्यासात्मक दृष्टि ५) हदीसशास्त्रावर विरोधकांच्या आक्षेपांचा आढ़ावा आणि आक्षेपांची उत्तरे,

३) फिक्ह (इस्लामी कार्यविधी) :- या विभागात (Faculty) १) फिक्हचे नियम, २) फिक्हचा इतिहास ३) आधुनिक कायद्याचे तत्त्वज्ञान ४) रोमन व पर्शियन कायदे 'ज्यू' धर्माचा नियम, आधुनिक कायदा आणि इस्लामी कायद्याचा तुलनात्मक अभ्यास, ५) 'इस्लामी फिक्ह' चे नियम, ६) कुरआन व हदीसच्या मार्गदर्शनानुसार प्रत्यक्ष इस्लामी नियम संपादन करण्याचा सराव.

४) युक्तिवाद शास्त्र : या विभागात खालील विषय असतील. १) युक्तिवादाचे मूळ नियम, २) आधुनिक आणि प्राचीन तत्त्वज्ञान (Phylosophy) ३) मुस्लिमांच्या युक्तिवादाचा आरंभ ते वर्तमान इतिहास, ४) युक्तिवादाचे नियम आणि कुरआन व हदीसचे मार्गदर्शन, ५) इस्लामवर विरोधकांच्या टीकांची समीक्षा आणि उत्तरे, ६) धर्मांचा तुलनात्मक अभ्यास विशेषतः ईसाई धर्माचा इतिहास आणि त्यातील विविध पंथांचा व युक्तिवादाचा वर्णनात्मक अभ्यास, ७) इसाई मिशनऱ्यांचे कार्य आणि पद्धती :

५) इस्लामचा इतिहास : या विभागात खालील दिलेले विषय असतील. १) फिलॉसॉफी (तत्त्वज्ञान) चा इतिहास, इतिहासाच्या अभ्यासाचा उद्देश आणि अभ्यासाची पद्धत कुरआननुसार इतिहास २) इतिहास तत्त्वज्ञानाचे विभिन्न मार्ग, 'इब्ने खुल्दून (इतिहास तज्ञ) पासून आजपर्यंत ३) अरबांचा आणि इस्लाम पूर्वीच्या मध्य युगाचा इतिहास, ४) प्रेषितकाळापासून आजपर्यंतचा इतिहास, ज्यामध्ये विचारसरणी, नैतिकता, शास्त्रांचा अभ्यास, संस्कृती व राज्यशास्त्र, ५) धर्माच्या पुनरुज्जीवनाविषक चळवळी आणि ६) मुस्लिम राज्यांवर पाश्चात्य प्रभावाचा इतिहास आणि त्याचे परिणाम.

## १२) तिसऱ्या कालखंडातील शोधकार्य :-

या काळात तिसऱ्या पर्वात दाखल होणारा विद्यार्थी उपरोल्लेखित विभागां (Faculty) पैकी एका विभागात कोणत्याही एका विशेष विषयावर दोन वर्षांपर्यंत शोधनिबंध सादर केल्यावर त्या विषयातील तज्ञ तपासणी करून त्यास उच्च शिक्षणाची पदवी प्रदान करण्यात येईल.

१३) या विद्यापीठासाठी एका प्रशस्त वाचनालयाची गरज आहे, जेणेकरून विद्यापीठाच्या उपरोल्लेखित गरजांनुसार मोठ्या प्रमाणात ग्रंथ आणि पुस्तके उपलब्ध होतील.

१४) विद्यापीठाच्या शिक्षण कार्यास्तव विभिन्न पर्व आणि विभागांसाठी (Faculty) योग्य पुस्तकांची निवड करणाऱ्या समितीचे गठन करण्यात यावे.

विद्यापीठाच्या गरजा पूर्ण करण्यासाठी योग्य पुस्तके व ग्रंथ तयार करणाऱ्या अकादमीची स्थापना करण्यात यावी.

समाप्त